


श्री बालतपस्वी कृपापोषित

धर्मवीर ग्रंथ रत्न माला

तृतीयरत्नम्.

# सुप्रबोधागम.

वेदमूर्ति साहित्यरत्नम् पंडित जगदीशशास्त्री नालवार.
यानीं सोलापूर येथें
'श्री बालतपस्वी' इ. प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केला.

प्रती ५००,

मिती वैशाख शुद्ध ५ शके १८६६

सन ] किंमत आठ आणे. [ १९४४

॥ श्रीमज्जगद्गुरु पंचाचार्याः प्रसीदंतु ॥

## —: प्रस्तावना :—

परमेश्वराच्या मुखांपासून उत्पन्न झालेल्या कामिकादि वातुलांत २८ शिवागमांच्या अंत्यभागांमध्यें वीरशैवमतधर्म अति उत्तम रीतीनें स्पष्ट करून सांगण्यांत आलेला आहे. 'चक्रनेमि क्रमेण' या म्हणी-प्रमाणें वीरशैव मताला ग्लानि प्राप्त होऊन कालवैपरित्यानें धर्मरूपी धनभांडार अशा शिवागमादिकांचा लोपझाल्यामुळें व स्वधर्मतेजो-राशींच्या अभावामुळें मताविषयीं सर्वत्र ग्लनिरूपी अंधःकार पसरला आहे. चालू काळांत 'स्वधर्माच्चलितान् राजा विनीय स्थापयेत्पथि' या कार्योक्तीप्रमाणें दुःस्थितींत असलेल्या आपल्या प्रजेला सन्मार्गावर आणण्यास सध्यांचे राज्यकर्ते आमच्या धर्माचे नसले तरी (परधर्मी असलेतरी) आपापल्या धर्माचें पुनरुज्जीवन करणाऱ्यांना मात्र ते प्रति-बंधक न होतां अनुकूलच झालेले आहेत. हें समाजाचें सुदैवच होय.

अशा सुसंधींत यथाशक्ति धर्मोन्नति करणें हें प्रत्येक धर्मा-भिमान्याचें कर्तव्य आहे.

धर्मजागृति करण्याचे अनेक उपाय आहेत. त्यांपैकीं सर्वांना विकत घेण्यास सुलभ, दुसऱ्याच्या मदतीखेरीज स्वतांलाच समजण्यास सुगम, आणि समजून त्याप्रमाणें वागण्यास योग्य असे करण्यास पुरातन असे दुर्मिळ मतग्रंथांचें मुद्रण करून त्यांचा प्रचार करणें हा एक उपाय आहे. हा उपाय आम्हीं यथाशक्ति हातीं घेतला आहे. तो पूर्ण करणें हें जगन्नियंत्या परमेश्वराकडे आहे.

वीरशैव धर्मग्रंथ कानडी, तेलगू, अरबी लिपींत व संस्कृत भाषेंत अधिक असल्याचें दिसून येतें. त्या ग्रंथांपैकीं प्राकृत टीका असलेले ग्रंथ फारच अल्प प्रमाणांत आहेत. व तेही कानडी, तेलगू,

अरबी या भाषामध्येंच आहेत. या योगानें महाराष्ट्रीय वीरशैव बांधवांना धर्मग्रंथांचा ज्ञानोदय होऊन धर्मजागृती होणार नाहीं. ती व्हावयास पाहिजे असल्यास मराठी टीकेनेंच होणार असें जाणून धर्मग्रंथ मराठी टीकेसह छापण्याचें कार्य सुरूं केलें आहे. प्रथम याच सद्धेतूनें श्रीमंत कै. वा. धर्मोद्धारक **रा. ब. अप्पासाहेब वारद** यांनीं वीरशैव लिंगीब्राह्मण धर्मग्रंथमालेचा आरंभ करून अनेक मत ग्रंथांचें मराठी टीकेसह मुद्रण करून वीरशैव समाजावर महदुपकार केले आहेत. त्या मालेपैकीं पांचवा ग्रंथ **सुप्रबोधागमांतर्गत** " पंचाचार्य पंचमोत्पत्ति प्रकरण " हा आहे. सध्यां हा ग्रंथ ग्राहकांना दुर्मिळ झाल्यामुळें या आम्हीं आरंभलेल्या श्री वालतपस्वी कृपापोषित **धर्मवीर ग्रंथ रत्न मालेंत** 'सुप्रबोधागम' या नांवानें (दुसरें नांव न ठेवतां पूर्वींच्याच नावानें) छापिला आहे. हें ३ रें ग्रंथरत्न होय. यामध्यें वीरशैव मतस्थापक, वीरशैव जगद्गुरु अशा पंचाचार्यांचा अवतार म्हणजे पंचमुखी परमेश्वराच्या सद्योजात मुखापासून-रेवणाराध्य, वामदेव मुखापासून मरुळाराध्य, अघोर मुखापासून—एकोरामाराध्य, तत्पुरुष मुखापासून—पंडिताराध्य व ईशान मुखापासून—विश्वाराध्य उद्भवलेले विषय; गोत्र, सूत्र, उपसूत्रें विवाह निषेध व महाचार्य, उपाचार्य यांच्या वागणुकीचा विषय सांगितलेला आहे. आणि परमेश्वराच्या ऊर्ध्वमुखापासून उत्पन्न झालेल्या पंचवक्त्रगणाधीश्वराच्या पांच मुखांपासून अनुक्रमें—मखारि, कालारि, पुरारि, स्मरारि, वेदारि हे पंचम; आणि यांच्या पासून उत्पन्न झालेले उपपंचम यांचें वर्णन आहे. सूत्रगोत्र वगैरे वाचकांना समजण्यास सोपें जावें या उद्देशानें त्यांचें कोष्टक शेवटीं दिलेलें आहे.

प्रकाशक.

# श्रीजगद्गुरु रेणुकाचार्यांच्या दीक्षा प्रकरणांतील विषयानुक्रमणिका.

विषय. पृष्ठ संख्या.



## श्रीजगद्गुरु मरुळाराध्यांच्या दीक्षा प्रकरणांतील विषयानुक्रमणिका.

## श्रीजगद्गुरु एकोरामाध्यांच्या दीक्षा प्रकरणांतील विषयानुक्रमणिका.



## श्रीजगद्गुरु पंडिताराध्यांच्या दीक्षा प्रकरणांतील विषयानुक्रमणिका.

## श्रीजगद्गुरु विश्वाराध्यांच्या दीक्षा प्रकरणांतील विषयानुक्रमणिका.

## पंचमोत्पत्ति प्रकरणाची विषयानुक्रमणिका.

# २८ दिव्य शिवागम.



| ग्रंथाचें नांव | श्लोक संख्या |
|---|---|
| १ कामिकागम | १ परार्ध |
| २ योगजागम | १ लक्ष |
| ३ चिंत्यागम | १ लक्ष |
| ४ कारणागम | १ कोटी |
| ५ अजितागम | १ लक्ष |
| ६ दीप्तागम | १ लक्ष |
| ७ सूक्ष्मामग | १ पद्म |
| ८ सहस्रागम | १ शंख |
| ९ अंशुमानागम | १० लक्ष |
| १० सुप्रबोधागम | ३ कोट |
| ११ विजयागम | ३ कोट |
| १२ विश्वासागम | १ कोट |
| १३ स्वयंभूआगम | ३॥ कोट |
| १४ अनिलागम | ३ लक्ष |
| १५ वीरागम | १ लक्ष |
| १६ रौरवागम | १० कोट |
| १७ मुकुटागम | १ लक्ष |
| १८ विमलागम | ३ लक्ष |
| १९ चंद्रज्ञानागम | ३ कोट |
| २० विंबागम | १ लक्ष |
| २१ प्रोद्गीतागम | ३ लक्ष |
| २२ ललितागम | ८ लक्ष |
| २३ सिद्धागम | ५० लक्ष |
| २४ संतानागम | ६ लक्ष |
| २५ सर्वोक्तागम | २ लक्ष |
| २६ परमेश्वरागम | १२ लक्ष |
| २७ किरणागम | ५ कोट |
| २८ वातुलागम | १ लक्ष |



श्रीजगद्गुरुपंचाचार्येभ्यो नमः



# सुप्रबोधागमे पंचाचार्योत्पत्तिः ॥

## पार्वत्युवाच ।

भगवन्ये त्वया प्रोक्ताः पंच पीठाधिदेवताः । स्वतंत्रा मुख्यगुरवो महांतश्चेति विश्रुताः ॥१॥ तथैवमस्वतंत्राणां प्रभेदं वक्तुमर्हसि । इत्येवं गिरिजापृष्टो भगवान्भूतभावनः ॥ अस्वतंत्रगुरूणां च प्रभेदं वक्तुमारभत् ॥२॥

## ईश्वर उवाच ।

पूर्वं मम मुखाज्जातः सद्योजाताच्च रेणुकः । लीलया चासृजत्स्वत्रं पड्त्रिंडीनामकं महत् ॥३॥ स एव रेवणाराध्यो भूत्वा लीला-

---

[१] पार्वती म्हणते, "हे भगवन् आपण जे पांच पीठाधिकारी सांगितले ते मोठे स्वतंत्र व मुख्य गुरु होत असें आपण म्हणतां; [२] तर, त्या प्रमाणेंच जे स्वतंत्र नाहींत त्यांचे देखील भेद आपण कृपा करून सांगा." या प्रमाणें पार्वतीनें विचारिल्यानंतर, सकल प्राणिमात्रांचा उत्पन्नकर्ता जो भगवान परमेश्वर; [३] त्यानें अस्वतंत्र

मथाकरोत् । तल्लीलया समुत्पन्नान्युपसूत्राणि द्वादश ॥४॥ पुराणं पच्छकंथा च षडंगः सुरगिस्तथा । महिषी दिगंबरश्चैव वेणी भित्तिस्तथैव च ॥५॥ मोरटश्चैव नाटश्च शौरी मुसडिकस्तथा । महासूत्रेण संयुक्ता उपसूत्रास्त्रयोदश ॥ ६ ॥ एते सर्वेऽप्यस्वतंत्रा जाता अपि महात्मना ।

## पार्वत्युवाच ।

महाचार्येण संभूताः कथं तेप्यस्वतंत्रकाः ॥७॥ अस्वातंत्र्ये कारणं किमेतद्विस्तरतो वद ।

## ईश्वर उवाच ।

सद्योजातमुखोत्पत्तिराहित्येन तथैव च ॥८॥ तदास्यकलशस्यापि

---

गुरूंचे भेद सांगण्यास सुरवात केली. ईश्वर सांगतात, "प्रथम माझ्या सद्योजात मुखापासून रेणुक उत्पन्न झाला व त्यानें सहज लीलेनें पड्विडी नांवाचें मोठें सूत्र उत्पन्न केलें. [४] तोच पुढें रेवणाराध्य होऊन लीला करिता झाला व त्या त्याच्या लीलांच्यायोगानें बारा उपसूत्रें उत्पन्न झालीं; [५] पुराण, पच्छकंथा, षडंग, सुरगि, माहिषी, दिगंबर, वेणी, भित्ति, [६] मोरट, नाट, शौरी व मुसडिक हींच तीं बारा उपसूत्रें असून पड्विडी महासूत्रासह एकंदर तेरा होतात. [७] हे सर्व जरी महात्म्यापासूनच उत्पन्न झालेले आहेत तरी ते अस्वतंत्रच समजावेत." पार्वती विचारते—"महाचार्यापासून उत्पन्न झालेले असून ते स्वतंत्र नाहींत हें कसें? [८] व ते अस्वतंत्र असण्याला कारण

हरिद्वर्णमयस्य च । अधिकारित्वराहित्यादनीशास्योद्भवत्वतः च ॥९॥ प्रसादपंचवर्णाख्यमंत्रस्यास्य महामते । उपदेष्टृत्वराहित्यात्कंजपत्रायतेक्षणे । वीरगोत्राभिधानात्तदृगाद्यागमजातिषु ॥१०॥ अधिकारित्वराहित्याद्वीरशैवालयेषु च । दीक्षालिंगोपदेशादिष्वकर्तारस्ततोऽभवन् ॥११॥

## पार्वत्युवाच ।

कथं कुर्वंत्यस्वतंत्रा वीरशैवालयेषु च । दीक्षोपदेशनं चैव लिंगधारणपूर्वकम् ॥१२॥ एतद्विस्तार्य भगवन्वक्तुमर्हसि सांप्रतम् ।

## ईश्वर उवाच ।

द्वादशाप्युपसूत्रज्ञा अस्वतंत्रा अपि स्वयम् ॥१३॥ महासूत्राधिप-

---

काय? हें सर्व विस्तारें करून आपण मला सांगा." ईश्वर सांगतात– "हे सद्योजात मुखापासून प्रत्यक्ष उत्पन्न झालेले नाहींत व तसेंच; [९] हरिद्वर्णमय (हिरव्या रंगाचा) जो त्या (सद्योजात) मुखाचा कलश त्याचाही अधिकार यांना नाहीं. परमेश्वराच्या मुखापासून उत्पन्न न झाल्यामुळें; [१०] प्रसाद पंचाक्षरी मंत्राचा उपदेश यांना करितां येत नसल्यामुळें; तसेंच वीरगोत्राचें नांव सांगत असल्यामुळें व ऋग्वेदादि आगमांचा [११] व वीरशैव लोकांच्या घरांतील कोणत्याही प्रकारचा अधिकार यांना नाहीं. याकरितांच दीक्षा किंवा लिंगोपदेश इत्यादि यांना करितां येत नाहींत; [१२] पार्वती विचारते–"हे स्वतंत्र नसून वीरशैव लोकांच्या घरीं लिंग धारणपूर्वक दीक्षा व उपदेश वगैरे कसें करितात?

तिना चोपदेशादनंतरम् । तदनुग्राहतस्तेषां गोत्रप्रवरवर्णकैः ॥१४॥ कलशैर्मंत्रदंडाद्यैः कमंडलुसमन्वितैः । वीरशैवालयेष्वेते चास्वतंत्राः प्रवर्तकाः ॥ १५ ॥

## पार्वत्युवाच ।

त्रयोदशोपसूत्राणामुपदेशोऽभवत्कथम् । गुरुः कोऽभूत्साक्षिणः के मंत्रः कः कलशश्च कः ॥१६॥ किं बीजं किंविधं लिंगं कस्यां दिशि समाचरेत् । इतीशान्या च संपृष्टो भगवानब्रवीद्वचः ॥१७॥

## ईश्वर उवाच ।

रेवणार्यसमुद्भूतास्त्रयोदशविधाश्च ये । उपसूत्रज्ञकास्तेषामुपदेशः प्रवक्ष्यते ॥१८॥ रेवणार्यं हरिद्वर्णं सद्योजातात्मकं मुखम् । कलशं

---

[१३] हें मला भगवन्, तुह्मी आतां सविस्तरपणें सांगा.' ईश्वर सांगतात–'बारा उपसूत्रज्ञ हे जरी स्वतः स्वतंत्र असे नाहींत; [१४] तरी महासूत्राधिपतींकडून उपदेश मिळाल्यानंतर त्यांच्याच अनुग्रहानें (कृपेने) गोत्र, प्रवर, वर्ण, [१५] कलश, मंत्र, दंड व कमंडलु यांसह स्वतंत्र नसूनही वीरशैव लोकांचे घरीं (दीक्षा उपदेशादि) धर्मक्रिया चालवितात." [१६] पार्वती विचारते– "तेरा जीं उपसूत्रें आहेत त्यांना उपदेश कसा दिला जातो? त्यांना गुरु कोण? साक्षी कोण असतात? त्यांचा मंत्र कोणता? त्यांना कलश; [१७] बीज व लिंग हीं कोणकोणतीं असतात? व त्यांना दिशा कोणती?" याप्रमाणें पार्वतीनें विचारिल्यानंतर भगवान तिला सांगूं लागतात. [१८] ईश्वर म्हणतात–"रेवणा-

मध्यमं बीजं नकारं विलिखेत्ततः ॥१९॥ नकाराख्ये महाबीजे कलशं विन्यसेद्बुधः। अधिदेवं रेवणार्यं मध्ये संभावयेद्गुरुम् २०। तत्स्थाने प्राक्तने रक्तं वामदेवमुखात्मकम्। कलशं च मकाराख्यबीजे संस्थापयेद्बुधः ॥२१। तत्राधिदैवतं चैव मरुळाराध्यनामकम्। साक्षीभूतं गुरुश्रेष्ठं। कारयित्वा ततः परम् ॥ २२ ॥ तत्स्थाने दक्षिणे कृष्णवर्णाघोरमुखात्मकम्। कलशं च शिकाराख्यं महाबीजं लिखेत्ततः ॥२३॥ शिकाराख्ये महाबीजे कलशं स्थापयेद्बुधः। तत्राधिदैवतं चैकोरामाराध्यं तथैव च ।२४॥ साक्षीभूताधिदेवं तं कारयित्वा ततः परम्। तत्स्थाने पश्चिमे शुभ्रवर्णं तत्पुरुषात्मकम् ।२५। कलशं च वकाराख्यं महाबीजं लिखेत्ततः।

---

चार्यापासून उत्पन्न झालेल्या तेरा उपसूत्रज्ञकांचा उपदेशविधि सांगतों; [१९] रेवणाराध्याला हिरवावर्ण, सद्योजातमुख व मध्यम कलश हीं असून त्याचा नकार बीजमंत्र लिहावा. नंतर; [२०] नकार महाबीजमंत्राचे ठिकाणीं कलशाची स्थापना करावी. अधिदेव जो रेवणार्य गुरु त्याची संभावना करावी; [२१] त्याच्या पूर्वदिशेला रक्त वामदेवमुख असून मकारबीज मंत्राच्या ठिकाणीं कलशाची स्थापना करावी; [२२] तेथील अधिदैवत जो मरुळाराध्य त्याला साक्षीभूत करावा. त्यानंतर [२३] त्याच्या दक्षिणेला कृष्णवर्ण अघोरमुख व कलश हीं असून शिकाराख्य महाबीज मंत्र लिहावा. नंतर [२४] शिकाराख्य महाबीजमंत्राचे ठिकाणीं कलशाची स्थापना करावी. तेथील अधिदैवत जो एकोरामाराध्य त्यालाही [२५] साक्षीभूत आधिदैवत करावें. पाश्चिम

वकाराख्ये महाबीजे कलशं स्थापयेद्बुधः ॥२६॥ तत्राधिदैवतं चैव पंडिताराध्यनामकम् । साक्षीभूतं कारयित्वा तथैव च ततः परम् ॥२७॥ तत्स्थाने चोत्तरे पीतवर्णेशानमुखात्मकम् । कलशं तद्यकाराख्यं महाबीजं लिखेत्ततः ॥२८॥ यकाराख्ये महाबीजे कलशं स्थापयेद्बुधः । तत्र विश्वाराध्यदेवं साक्षीकृत्याधिदैवतम् ॥२९॥ ततः परं प्रवक्ष्यामि रेवणाराध्यलीलया । समुद्भूतोपसूत्रज्ञास्त्रयोदशविधाश्च ये ॥३०॥ आगमोक्तविधानेन ॐ न्हां न्हीं न्हूं न्हैं न्हौं परम् । नमः शिवायेति मंत्रं दशाक्षरमनूत्तमम् ।३१॥ प्रसादाख्यं महामंत्रमुपदिष्टाः पृथक् पृथक् । रेवणाराध्यगुरुणा हरिद्वर्णमयं तथा ।३२॥ लिंगं धृतास्ततः सर्वे

---

दिशेला शुभ्रवर्ण तत्पुरुषाख्य [२६] कलश असावा व वकाराख्य महाबीजमंत्र लिहावा. नंतर वकार महाबीजाच्या ठिकाणीं कलशाची स्थापना करावी; [२७] तेथील अधिदैवत पंडिताराध्य हे असून त्यांना साक्षीभूत करावें. नंतर त्याप्रमाणेंच [२८] उत्तर दिशेला पीतवर्ण ईशानात्मक कलश घेऊन यकार महाबीज मंत्र लिहावा. नंतर [२९] यकाराख्ये महाबीजाच्या ठिकाणीं कलशाची स्थापना करावी. विश्वाराध्य हे तेथील अधिदैवत असून त्यांना साक्षी करावें. [३०] त्यानंतर रेवणाराध्याच्या लीलेनें उत्पन्न झालेले जे तेरा उपसूत्रज्ञ ते मी तुला सांगतों; [३१] आगमोक्त विधानाप्रमाणें "ॐ न्हां न्हीं न्हूं न्हैं न्हौं नमः शिवाय" हा दशाक्षरी मंत्र सर्वांमध्यें उत्तम असा आहे; [३२] प्रसाद नांवाचा जो महामंत्र आहे त्याचा उपदेश निराळाच

तन्मतालंबिनश्च ते । तस्मात्तत्पड्विडी चैव पुराणं पच्छकंथकम् ॥३३॥ षडंगः सुरगः चैव महिषी च दिगंबरम् । वेणी भित्तिश्च मोरटं नाटिः शौरी तथैव च ॥३४॥ मुसडीति महासूत्रसंयुक्तास्ते त्रयोदश । एवं भेदवतां सद्योजाताननसमुद्भवः ॥३५॥ वीरगोत्राधिनाथश्च सिंहासनपतिश्च यः । रेवणाराध्यसन्नामा जगद्गुरुत्तमश्च सः ॥३६॥ एभिस्त्रयोदशाविधैरुपदिष्टाश्च सर्वशः । तेषां चैव गुरूणां च लिंगधारणकर्मणि ॥३७॥ दीक्षोपदेशयोश्चैव विवाहादौ तथैव च । चरस्थापनपट्टाभिषेकेषु शुभकर्मसु ॥३८॥ तथैवानुग्रहे चैव शिक्षणेऽपि तथैव च । आह्वाने च विसर्जे च सद्योजातमुखोद्भवः ॥३९॥ परमो रेवणाराध्यो मुख्यकर्ता

---

करावा लागतो. रेवणाराध्य गुरूनें जसें हरिद्वर्णमय (हिरव्या रंगाचें) [३३] लिंग धारण केलेलें आहे त्याप्रमाणेंच त्याच्या मताचें अवलंबन करणारे (हिरव्या रंगाचें लिंग) धारण करितात. या प्रमाणें पड्विडी, पुराण, पच्छकंथा ३४] षडंग, सुरगी, माहिषी, दिगंबर, वेणी, भित्ति, मोरेट, नाटि, शौरी व त्या प्रमाणेंच [३५] मुसडी असे महासूत्रांसह एकंदर तेरा होतात. याप्रमाणें जे तेरा भेद सांगितलेले आहेत ते सद्योजातमुखापासून उत्पन्न झालेले आहेत. [३६] वीरगोत्राचा अधिनाथ व सिंहासनपति जो रेवणाराध्य नांवाचा तो श्रेष्ठ जगद्गुरु होय. [३७] ह्या तेरांकडूनच सर्व प्रकारें उपदेश दिला जातो. (परंतु) ह्या सर्व गुरूंमध्यें, लिंगधारणक्रियेच्या वेळीं [३८] दीक्षा किंवा उपदेश द्यावयाचा असल्यास, लग्नकालीं, चरमूर्तींच किंवा पट्टाधि-

गुरूत्तमः । तस्मान्मन्मुखसंजाताः स्वतंत्राश्चेति विश्रुताः ॥४०॥ तेभ्यो ये च समुत्पन्ना उपसूत्रास्त्रयोदश । अमुख्यास्तेप्यस्वतंत्रा महाचार्यानुगाश्च ते ॥४१॥ तेभ्यश्चैवोपदिष्टास्तु सामान्या वीरशैवकाः । ते पंचमा इति ख्याता उपपूर्वास्तथेतरे ॥४२॥

इति रेवणाचार्यदीक्षाप्रकरणम्

---

कार्‍यांना अभिषेक करावयाचा असल्यास शुभकार्यांच्या वेळीं [३९] त्याप्रमाणेंच अनुग्रह किंवा शिक्षा करावयाची असल्यास, आव्हान व विसर्जन करावयाचे वेळीं सद्योजात मुखापासून उत्पन्न झालेला [४०] श्रेष्ठ रेवणाराध्य गुरुवर हाच मुख्य कर्ता होय. याकरितां माझ्या मुखापासून जे उत्पन्न झालेले आहेत त्यांनां व स्वतंत्र असें म्हटलेलें आहे. ( तेच स्वतंत्र होत ) [४१] त्यांच्यापासून उत्पन्न झालेले जे तेरा उपसूत्रज्ञ ते ( कोणत्याही कार्यांत ) मुख्य किंवा स्वतंत्र नसून केवल महाचार्याला अनुसरणारे होत. [४२] जे वीरशैव त्यांच्याकडून दीक्षा घेतात ते सामान्य होत. हे पंचम असून यांच्या पासून जे इतर झालेले आहेत त्यांना उपपंचम म्हणतात.

येथें रेवणाचार्यांचें दीक्षाप्रकरण संपलें.



श्रीजगद्गुरुपंचाचार्येभ्यो नमः



# सुप्रबोधागमे पंचाचार्योत्पत्तिः ॥

## पार्वत्युवाच ।

भगवन्ये त्वया प्रोक्ताः पंचपीठाधिदेवताः । स्वतंत्रा मुख्यगुरवो महांतश्चेति विश्रुताः ॥४३॥ तथैवमस्वतंत्राणां प्रभेदं वक्तुमर्हसि । इत्येवं गिरिजापृष्टो भगवान्भूतभावनः ॥४४॥ अस्वतंत्रगुरूणां च प्रभेदं वक्तुमारभत् ।

## ईश्वर उवाच ।

पूर्वं मम मुखाज्जातो वामदेवाच्च दारुकः ॥४५॥ लीलया व्यसृजत्सूत्रं वृष्टिनाम महत्तरम् । स एव मरुळाराध्यो भूत्वा लीलाम-

---

[४३] पार्वती म्हणते, "हे भगवन्! आपण जे पांच पीठाधिकारी सांगितले ते मोठे स्वतंत्र व मुख्य गुरु होत असें आपण म्हणतां; [४४[ तर, त्याप्रमाणेंच जे स्वतंत्र नाहींत त्यांचे देखील भेद आपण कृपा करून सांगा." या प्रमाणें पार्वतीनें विचारल्यानंतर, सकल प्राणिमात्रांचा उत्पन्नकर्ता जो भगवान् परमेश्वर; [४५] त्यानें अस्वतंत्र

थाकरोत् ॥४६॥ तल्लीलया समुत्पन्नान्युपसूत्राणि द्वादश। लोहकंथा स्वर्णकंथा श्रृंगी मसणिरेव च ॥४७॥ कुठारश्च तथा भैत्री कठारश्चामरी तथा । कवाटः कुक्षकंथा च ज्वलत्कंथा तथैव च ॥४८॥ सिंही चैते महावृष्टिसूत्रयुक्तास्त्रयोदश । एते सर्वेऽप्य-स्वतंत्रा जाता अपि महात्मना ॥४९॥

## पार्वत्युवाच ।

महाचार्येण संभूताः कथं तेऽप्यस्वतंत्रकाः । अस्वातंत्र्ये कारणं किमेतद्विस्तरतो वद ॥५०॥

## ईश्वर उवाच ।

वामदेवमुखोत्पत्तिराहित्येन तथैव च । तदास्यकलशस्यापि रक्त-

---

गुरूंचे भेद सांगण्यास सुरवात केली. ईश्वर सांगतात, "प्रथम माझ्या वामदेव मुखापासून दारुक उत्पन्न झाला [४६] त्यानें सहज लीलेनें वृष्टि नांवाचें मोठें सूत्र उत्पन्न केलें. तोच पुढें मरुळाराध्य होऊन लीला करिता झाला [४७] व त्या त्याच्या लीलांच्यायोगानें बारा उपसूत्रें उत्पन्न झालीं. लोहकंथा, स्वर्णकंथा, श्रृंगी, मसणी, [४८] कुठार, भैत्री, कठार, चामरी, कवाट, कुक्षकंथा, ज्वलत्कंथा [४९] व सिंही अशीं तीं बारा उपसूत्रें असून वृष्टि महासूत्रासह एकंदर तेरा होतात. हे सर्व जरी महात्म्यापासूनच उत्पन्न झालेले आहेत तरी ते अस्वतंत्रच समजावेत." [५०] पार्वती विचारते— "महाचार्यापासून उत्पन्न झालेले असून ते स्वतंत्र नाहींत हें कसें ? व ते अस्वतंत्र

वर्णमयस्य च ॥५१॥ अधिकारित्वराहित्यादनीशास्योद्भवत्वतः नंदिगोत्राभिधानाच्च मायापंचाक्षरस्य च ॥५२॥ उपदेष्टृत्वराहित्यादृगाद्यागमजातिषु । अधिकारित्वराहित्याद्वीरशैवालयेषु च ॥५३॥ दीक्षालिंगोपदेशादिष्वकर्तारस्ततोऽभवन् ।

## पार्वत्युवाच ।

कथं कुर्वंत्यस्वतंत्रा वीरशैवालयेषु च ॥५४॥ दीक्षोपदेशनं चैव लिंगधारणपूर्वकम् । एतद्विस्तार्य भगवन्वक्तुमर्हसि सांप्रतम् ॥५५॥

## ईश्वर उवाच ।

त्रयोदशोपसूत्रज्ञा अस्वतंत्रा अपि स्वयम् । महासूत्राधिपतिना चोपदेशादनंतरम् ॥५६॥ तदनुग्राहतस्तेषां गोत्रप्रवरवर्णकैः ।

---

असण्याला कारण काय? हें सर्व विस्तारेंकरून आपण मला सांगा." [५१] ईश्वर सांगतात—"हे वामदेव मुखापासून प्रत्यक्ष उत्पन्न झालेले नाहींत व तसेंच रक्तवर्णमय (तांबड्या रंगाचा) जो त्या वामदेव मुखाचा कलश [५२] त्याचाही अधिकार यांना नाहीं. परमेश्वराच्या मुखापासून उत्पन्न झालेलें जें नंदिगोत्र त्याच्या माया पंचाक्षरी मंत्राचा [५३] उपदेश यांना करितां येत नाहीं; व त्याप्रमाणेंच ऋग्वेदादि वेदागमांचा व वीरशैव लोकांचे घरीं कोणत्याही प्रकारचा अधिकार यांना नाहीं. [५४] याकरितांच दीक्षा किंवा लिंगोपदेश इत्यादि यांना करितां येत नाहींत." पार्वती विचारते—"हे स्वतंत्र नसून वीरशैव लोकांच्या घरीं [५५] लिंग धारणपूर्वक दीक्षा व उपदेश वगैरे कसें करितात? हें

कलशैर्मंत्रदंडाद्यैः कमंडलुसमन्वितैः ॥५७॥ वीरशैवालयेष्वेते चास्वतंत्राः प्रवर्तकाः।

## पार्वत्युवाच ।

त्रयोदशोपसूत्राणामुपदेशोऽभवत्कथम् ॥५८॥ गुरुः कोऽभूत्साक्षिणः के मंत्रः कः कलशश्च कः । किं बीजं किं विधं लिंगं कस्यां दिशि समाचरेत् ॥५९॥ इतीशान्या च संपृष्टो भगवानब्रवीद्वचः ।

## ईश्वर उवाच ।

मरुळाराध्यसंभूतास्त्रयोदशविधाश्च ये ॥६०॥ उपसूत्रज्ञकास्तेषामुपदेशः प्रवक्ष्यते । मरुळार्यस्य रक्ताभं वामदेवमुखात्मकम् ॥६१॥ कलशं मध्यमं बीजं मकारं विलिखेत्ततः । मकाराख्ये महाबीजे

---

मला, भगवन् तुह्मी आतां कृपा करून सविस्तरपणें सांगा." [५६] ईश्वर सांगतात–'बारा उपसूत्रज्ञ हे जरी स्वतः स्वतंत्र असे नाहींत तरी महासूत्राधिपतींकडून उपदेश मिळाल्यानंतर [५७] त्यांच्याच अनुग्रहानें गोत्र, प्रवर, वर्ण, कलश, मंत्र, दंड व कमंडलु यांसह [५८] स्वतंत्र नसूनही वीरशैव लोकांचे घरीं (दीक्षा उपदेशादि) धर्मक्रिया चालवितात." पार्वती विचारते–"तेरा जीं उपसूत्रें आहेत. त्यांना उपदेश कसा दिला जातो? [५९] त्यांना गुरु कोण? साक्षी कोण कोण असतात? त्यांचा मंत्र कोणता? त्यांना कलश, बीज व लिंग हीं कोणकोणतीं असतात? व त्यांना दिशा कोणती?" [६०] याप्रमाणें पार्वतीनें विचारल्यानंतर भगवान परमेश्वर तिला सांगूं लागतात. ईश्वर म्हणतात–"मरुळाराध्यापासून उत्पन्न झालेले जे तेरा [६१]

कलशं तं न्यसेद्बुधः ॥६२॥ मरुळाराध्यमध्यक्षं मध्ये संभावये-द्गुरुम् । तत्स्थाने प्राक्तने कृष्णवर्णाघोरमुखात्मकम् ॥६३॥ कलशं च शिकाराख्यं महाबीजं लिखेत्ततः । शिकाराख्ये महाबीजे तत्करीरं न्यसेद्बुधः ॥६४॥ तत्राधिदैवतं चैकोरामाराध्यं तथैव च साक्षीभूताधिदैवं तं कारयित्वा ततः परम् ॥६५॥ तत्स्थाने दक्षिणे शुभ्रवर्णं तत्पुरुषात्मकम् । कलशं च वकाराख्यं महाबीजं लिखे-त्ततः ॥६६॥ वकाराख्ये महाबीजे कलशं तत्र विन्यसेत् । तत्रा-धिदैवतं चैव पंडिताराध्यनामकम् ॥६७॥ साक्षीभूतं कारयित्वा तथैव च ततः परम् । तत्स्थाने पश्चिमे पीतवर्णेशानमुखात्म-कम् ॥६८॥ कलशं तद्यकाराख्यं महाबीजं लिखेत्ततः । यकाराख्ये

---

उपसूत्रज्ञ त्यांचा उपदेशविधि सांगतों. मरुळाराध्याला वामदेवमुखात्मक रक्तवर्ण [६२] कलश असून त्याचा मकार बीजमंत्र मध्यठिकाणीं लिहावा. नंतर त्या मकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं कलशाची स्थापना करावी [६३] अध्यक्ष जो मरुळाराध्यगुरु त्याची मध्यें संभावना करावी. त्याच्या पूर्वदिशेला अघोरमुखात्मक कृष्णवर्ण [६४] कलश असावा व त्याचा शिकाराख्य महाबीज मंत्र लिहावा. शिकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं त्या कलशाची स्थापना करावी [६५] तेथील आधिदैवत जो एकोरामाराध्य त्याला साक्षीभूत करावा. त्यानंतर [६६] त्याच्या दक्षिण दिशेला तत्पुरुषमुखात्मक शुभ्रवर्ण कलश असावा व त्याचा वकाराख्य महाबीज मंत्र लिहावा. [६७] यकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं कलशाची स्थापना करावी.

---

कलशं, घटं; 

महाबीजे कलशं स्थापयेद्बुधः ॥६९॥ विश्वाराध्याभिधं चैव कृत्वा वै साक्षिणं पुनः । तत्स्थाने चोत्तरे चैव हरिद्वर्णात्मकं तथा ॥७०॥ कलशं तं नकाराख्यं महाबीजं लिखेत्ततः । नकाराख्ये महाबीजे कलशं स्थापयेद्बुधः ॥७१॥ रेणुकाराध्यमध्यक्षं साक्षिणं तं विधाय च । ततः परं प्रवक्ष्यामि मरुळाराध्यलीलया ॥७२॥ समुद्भूतोपसूत्रज्ञास्त्रयोदशविधाश्च ते । आगमोक्तविधानेन ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं चाप्यतः ॥७३॥ नमः शिवाय मंत्रांतं नवाक्षरमनुत्तमम् । मायापंचाक्षराख्यं ते ह्युपादिष्टाः पृथक् पृथक् ॥७४॥ मरुळाराध्यगुरुणा रक्तवर्णमयं तथा । लिंगं दध्रुस्तथा सर्वे तन्मतालंबिनश्च ते ॥७५॥ तस्माद्वृष्टिर्लोहकंथा स्वर्णकंथा तथैव च । शृंगी च

---

तेथील आधिदैवत जो पंडिताराध्य नांवाचा [६८] त्यालाही साक्षीभूत करावा. त्याप्रमाणेंच, नंतर त्याच्या पश्चिम दिशेला ईशानमुखात्मक नीलवर्ण [६९] कलश असावा व त्याचा यकाराख्य महाबीजमंत्र लिहावा. यकाराख्य महाबीजमंत्राचे ठिकाणीं कलशाची स्थापना करावी [७०] तेथील आधिदैवत विश्वाराध्य असून त्याला साक्षी करावा. त्याच्या उत्तर दिशेला पिवळ्या रंगाचा [७१] कलश असावा व नकाराख्य महाबीजमंत्र लिहावा. नकाराख्य महाबीजमंत्राच्या ठिकाणीं कलशाची स्थापना करावी [७२] तेथील अध्यक्ष जो रेणुकाराध्य त्या अधिदैवताला साक्षीभूत करावा. यापुढें ( पार्वति, ) मरुळाराध्याची लीला सांगतों. त्याच्या लीलेनें [७३] तेरा उपसूत्रज्ञ उत्पन्न झाले, व त्यांना आगमोक्त विधानानें ॐ 'ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं

मसाणिश्चैव कुठारो भैत्रिकः परम् । कठारश्चामरी चैव कवाटं च ततः परम् ॥ कुक्षिकंथा ज्वलत्कंथा सिंही चेति महेश्वरि ॥ महासूत्रसमायुक्तास्त्रयोदश समीरिताः । एवं भेदवतां वामदेवानन-समुद्भवः ॥७६॥ नंदिगोत्राधिनाथश्च सिंहासनपतिश्च यः । मरुळाराध्यसन्नामा जगद्गुरुत्तमश्च सः ॥७७॥ एभिस्त्रयोदशविधैरुप-दिष्टाश्च सर्वशः । तेषां च तद्गुरूणां च लिंगधारणकर्मणि ॥७८॥ दीक्षोपदेशयोश्चैव विवाहादौ तथैव च । चरस्थापनपट्टाभिषेकेषु शुभकर्मसु ॥७९॥ निग्रहेऽनुग्रहे चैवमाह्वाने च विसर्जने । मरुळाराध्य एवासौ मुख्यकर्ता गुरूत्तमः ॥८०॥ तस्मान्मन्मुखसंजाताः स्वतंत्राश्चेति विश्रुताः । तेभ्यो ये च समुत्पन्ना उपसूत्रास्त्रयो-

---

[७४] नमः शिवाय' ह्या सर्वोत्कृष्ट नऊ अक्षरांचा व मायापंचाक्षर या नांवाच्या मंत्राचा त्यांना वेगवेगळा उपदेश द्यावा लागतो. [७५] मरुळाराध्य गुरूनें जसें लाल रंगाचें लिंग धारण केलेलें आहे त्याप्र-माणेंच त्याच्या मताचें अवलंबन करणारे लाल रंगाचें लिंग धारण करितात. [७६] म्हणून वृष्टि, लोहकंथा, स्वर्णकंथा व त्याप्रमाणेंच श्रृंगी, मसाणि, कुठार, भैत्रि, कठार, चामरी, कवाट, कुक्षिकंथा, ज्वलत्कंथा व सिंही असे महासूत्रांसह एकंदर तेरा होतात. हे जे तेरा भेद सांगितलेले आहेत, ते वामदेवमुखापासून उत्पन्न झालेले आहेत. [७७] नंदीगोत्राचा अधिनाथ व सिंहासनपति जो मरुळाराध्य नांवाचा तो श्रेष्ठ जगद्गुरु होय. [७८] ह्या तेरांकडूनच सर्व प्रकारें उपदेश दिला जातो. परंतु ह्या सर्व गुरूंमध्यें लिंग धारण क्रियेच्या वेळीं

दश ॥८१॥ तेभ्यश्चैवोपदिष्टास्तु सामान्या वीरशैवकाः । ते पंचमा इति ख्याता उपपूर्वास्तथेतरे ॥८२॥

इति दारुकाचार्यदीक्षाप्रकरणम् ।

---

[७९] दीक्षा किंवा उपदेश द्यावयाचा असल्यास, लग्नकालीं, चर-मूर्तीची स्थापना किंवा पट्टाधिकाऱ्यांना अभिषेक करावयाचा अस-ल्यास, शुभ कार्यांच्या वेळीं, [८०] त्याप्रमाणेंच अनुग्रह किंवा निग्रह करावयाचा असल्यास, आव्हान व विसर्जन करावयाच्या वेळीं, वामदेव मुखापासून उत्पन्न झालेला श्रेष्ठ मरुळाराध्यगुरुवर हाच मुख्य कर्ता होय. [८१] याकरितां माझ्या मुखांपासून जे उत्पन्न झालेले आहेत त्यांनाच स्वतंत्र असें म्हटलेलें आहे, तेच स्वतंत्र होत. त्यांच्यापासून उत्पन्न झालेले जे तेरा उपसूत्रज्ञ ते कोणत्याही कार्यांत मुख्य किंवा स्वतंत्र नसून केवल महाचार्याला अनुसरणारे होत. [८२] जे वीरशैव त्यांच्याकडून दीक्षा घेतात, ते सामान्य होत. हे पंचम असून यांच्या पासून जे इतर झालेले आहेत त्यांना उपपंचम म्हणतात.

येथें दारुकाचार्यांचें दीक्षाप्रकरण संपलें.

श्रीजगद्गुरुपंचाचार्येभ्यो नमः



# सुप्रबोधागमे पंचाचार्योत्पत्तिः ॥

## पार्वत्युवाच ।

त्वया प्रोक्ताश्च भगवन्पंच पीठाधिदेवताः । स्वतंत्रा मुख्यगुरवो महांतश्चेति विश्रुताः ॥८३॥ तथैवमस्वतंत्राणां प्रभेदं वक्तुमर्हसि । इत्येवं गिरिजापृष्टो भगवान् भूतभावनः ॥८४॥ अस्वतंत्रगुरूणां च प्रभेदं वक्तुमारभत् ।

## ईश्वर उवाच ।

पूर्वं मद्वदनाज्जातश्चाघोराच्छंकुकर्णकः ॥८५॥ लीलयैवासृजत्सूत्रं मुक्तागुच्छं महत्तरम् । स एकोरामनामासीत् स च लीलाम-

---

[८३] पार्वती म्हणते, "हे भगवन्, आपण जे पांच पीठाधिकारी सांगितले, ते मोठे स्वतंत्र व मुख्य गुरु होत असें आपण म्हणतां; [८४] तर, त्याप्रमाणेंच जे स्वतंत्र नाहींत त्यांचे देखील भेद आपण मला कृपा करून सांगा." याप्रमाणें पार्वतीनें विचारल्यानंतर, सकल प्राणिमात्रांचा उत्पन्नकर्ता जो भगवान् परमेश्वर; [८५] त्यानें अस्वतंत्र

थाकरोत् ॥८६॥ तल्लीलया समुत्पन्नान्युपसूत्राणि द्वादश । गोणीकंथा च दंती च जठरस्त्रिगुणस्तथा ॥८७॥ केशकंथा ललाटश्च व्याघ्रकंथा तथैव च । लोचनं भगिनी चैव जालकंथा तथैव च ॥८८॥ नटनं वदडिश्चैवं महासूत्रेण संयुताः । त्रयोदशविधाश्चैकोरामाराध्यसमुद्भवाः ॥८९॥ एते सर्वेऽप्यस्वतंत्रा जाता अपि महात्मना ।

## पार्वत्युवाच ।

महाचार्येण संभूताः कथं तेऽप्यस्वतंत्रकाः ॥९०॥ अस्वातंत्र्ये कारणं किमेतद्विस्तरतो वद ।

## ईश्वर उवाच ।

अघोराख्यमुखोत्पत्तिराहित्येन तथैव च ॥९१॥ तदास्यकलश-

---

गुरूंचे भेद सांगण्यास सुरवात केली. ईश्वर सांगतात, "प्रथम माझ्या अघोरमुखापासून शंकुकर्ण उत्पन्न झाला. [८६] त्यानें सहज लीलेनें मुक्तागुच्छ नांवाचें मोठें सूत्र उत्पन्न केलें. तोच पुढें एकोरामाराध्य होऊन लीला करितां झाला [८७] व त्या त्याच्या लीलांच्यायोगानें बारा उपसूत्रें उत्पन्न झालीं. गोणीकंथा, दंती, जठर, त्रिगुण [८८] केशकंथा, ललाट, व्याघ्रकंथा, लोचन, भगिनी, जालकंथा [८९] नटन व वडदी अशीं तीं बारा उपसूत्रें असून मुक्तागुच्छ महासूत्रासह एकंदर तेरा होतात व ते एकोरामाराध्यापासून उत्पन्न झालेले आहेत. [९०] हे सर्व जरी महात्म्यापासूनच उत्पन्न झालेले आहेत तरी ते अस्वतंत्रच समजावेत" पार्वती विचारते—"महाचार्यापासून उत्पन्न झालेले असून

स्यापि कृष्णवर्णमयस्य च । अधिकारित्वराहित्यादनीशास्योद्भवत्वतः ॥९२॥ भृंगिगोत्राभिधानाच्च स्थूलाष्टाक्षरमंत्रके । उपदेष्टृत्वराहित्यादृगाद्यागमजातिषु ॥९३॥ अधिकारित्वराहित्याद्वीरशैवालयेषु च । दीक्षालिंगोपदेशादिष्वकर्तारस्ततोऽभवन् ॥९४॥

## पार्वत्युवाच ।

कथं कुर्वंत्यस्वतंत्रा वीरशैवालयेषु च । दीक्षोपदेशनं चैव लिंगधारणपूर्वकम् ॥९५॥ एतद्विस्तरतो ब्रूहि लोकानुग्रहकांक्षया ।

## ईश्वर उवाच ।

त्रयोदशोपसूत्रज्ञा अस्वतंत्रा अपि स्वयम् ॥९६॥ महासूत्राधिप-

---

ते स्वतंत्र नाहींत हें कसें? [९१] व ते अस्वतंत्र असण्याला कारण काय? हें सर्व विस्तारेंकरून आपण मला सांगा." ईश्वर सांगतात–"हे अघोरमुखापासून प्रत्यक्ष उत्पन्न झालेले नाहींत व तसेंच [९२] कृष्णवर्णमय ( काळ्या रंगाचा ) जो त्या अघोरमुखाचा कलश त्याचाही अधिकार यांना नाहीं. परमेश्वराच्या मुखापासून उत्पन्न झालेलें जें [९३] भृंगिगोत्र त्याच्या स्थूल अष्टाक्षर मंत्राचा उपदेश यांना करितां येत नाहीं; व त्याप्रमाणेंच ऋग्वेदादि वेदागमांचा [९४] अधिकार यांना नसल्यामुळें वीरशैव लोकांचे घरीं दीक्षा किंवा लिंगोपदेश इत्यादि कर्में यांना करितां येत नाहींत" पार्वती विचारते–"हे स्वतंत्र नसून वीरशैव लोकांच्या घरीं लिंगधारणपूर्वक दीक्षा व उपदेश वगैरे कसा करितात? [९६] हें मला भगवन्, तुह्मी आतां कृपा करून

तिना चोपदेशादनंतरम् । तदनुग्रहतस्तेषां गोत्रप्रवरवर्णकैः ॥९७॥ कलशैर्मंत्रदंडाद्यैः कमंडलुसमन्वितैः । वीरशैवालयेष्वेते चास्वतंत्राः प्रवर्तकाः ॥९८॥

## पार्वत्युवाच ।

त्रयोदशोपसूत्राणामुपदेशोऽभवत्कथम् । गुरुः कोऽभूत्साक्षिणः के को मंत्रः कलशश्च कः ॥९९॥ किं बीजं किं विधं लिंगं कस्यां दिशि समाचरेत् । इतीशान्या च संपृष्टो भगवानब्रवीद्वचः ॥१००॥

## ईश्वर उवाच ।

एकोरामार्यसंभूतास्त्रयोदशविधाश्च ये । उपसूत्रज्ञकास्तेषामुपदेशः

---

सविस्तरपणें सांगा." ईश्वर सांगतात—"तेरा उपसूत्रज्ञ हे जरी स्वतः स्वतंत्र असे नाहींत [९७] तरी महासूत्राधिपतींकडून उपदेश मिळाल्यानंतर त्यांच्याच अनुग्रहानें गोत्र, प्रवर, वर्ण, [९८] कलश, मंत्र, दंड व कमंडलु यांसह स्वतंत्र नसूनही वीरशैव लोकांचे घरीं दीक्षा उपदेशादि धर्मक्रिया चालवितात." [९९] पार्वती विचारते—"तेरा जीं उपसूत्रें आहेत. त्यांना उपदेश कसा दिला जातो? त्यांना गुरु कोण? साक्षी कोण कोण असतात? त्यांचा मंत्र कोणता? त्यांना कलश [१००] बीज व लिंग हीं कोणकोणतीं असतात? व त्यांची दिशा कोणती?" याप्रमाणें पार्वतीनें विचारल्यानंतर भगवान् परमेश्वर तिला सांगूं लागतात. [१०१] ईश्वर म्हणतात—"एकोरामाराध्यापासून उत्पन्न झालेले जे तेरा उपसूत्रज्ञ त्यांचा उपदेशविधि सांगतों. [१०२]

प्रवक्ष्यते ॥१०१॥ एकोरामस्य कृष्णाभमघोरवदनात्मकम् । कलशं मध्यमं बीजं शिकारं विलिखेत्ततः ॥१०२॥ शिकाराख्ये महाबीजे कलशं स्थापयेद्बुधः । एकोरामंचाधिदैवं मध्ये संभावये-द्गुरुम् ॥१०३॥ तत्स्थाने पूर्वदिक्संस्थं शुभ्रं तत्पुरुषात्मकम् । कलशं च वकाराख्यं मंत्रबीजं लिखेत्तदा ॥१०४॥ वकाराख्ये महाबीजे तत्करीरं न्यसेद्बुधः । अधिदैवं पंडितार्यं साक्षीभूतं समाचरेत् ॥१०५॥ तत्स्थाने दक्षिणे सुस्थं पीतेशानमुखात्मकम् । कलशं च यकाराख्यं मंत्रबीजं लिखेत्ततः ॥१०६ । यकाराख्ये महाबीजे तत्करीरं न्यसेद्बुधः । तत्राधिदैवतं विश्वाराध्यं कृत्वा ततः परम् ॥१०७॥ तत्स्थाने पश्चिमदिशि युक्तं च हरितं तथा ।

---

एकोरामाराध्याला अघोरमुखात्मक कृष्णवर्ण कलश असून त्याचा शिकार बीजमंत्र मध्यठिकाणीं लिहावा. [१०३] नंतर त्या शिकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं कलशाची स्थापना करावी. अधिदैवत जो एकोरामाराध्यगुरु त्याची मध्यें संभावना करावी. [१०४] त्याच्या पूर्वदिशेला तत्पुरुषमुखात्मक शुभ्र कलश असावा व त्याचा वकाराख्य मंत्रबीज लिहावा [१०५] वकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं त्या कलशाची स्थापना करावी. तेथील अधिदैवत जो पंडिताराध्य त्याला साक्षी करावा. [१०६] त्याच्या दक्षिण दिशेला ईशानमुखात्मक निळ्या रंगाचा कलश ठेवावा व त्याचा यकाराख्य महाबीज मंत्र लिहावा. नंतर [१०७] यकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं कलशाची स्थापना करावी. तेथील अधिदैवत विश्वाराध्य असून त्याला साक्षी करावा.

सद्योजातात्मकं वक्त्रं कारयित्वा करीरकम् ॥१०८॥ नकारं च विलिख्याथ तस्योपरि करीरकम् । विन्यस्य रेवणाराध्यं कृत्वा साक्षिणमव्ययम् ॥१०९॥ तत्स्थाने चोत्तरदिशि विशिष्टं वामदेवकम् । रक्तवर्णसमायुक्तं मकारं विलिखेत्ततः ॥ ११० ॥ तस्योपरि न्यसेद्वामदेवात्मककरीरकम् । मरुळाराध्यमध्यक्षं साक्षीभूतं समादिशेत् ॥१११॥ तथापरं प्रवक्ष्यामि एकोरामार्यलीलया । समुद्भूतोपसूत्रज्ञास्त्रयोदशविधाश्च ते ॥११२॥ आगमोक्तप्रकारेण ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ततः परम् । नमः शिवायेति मंत्रमष्टवर्णसमन्वितम् ॥११३॥ सूक्ष्मपंचाक्षराख्यं तं मंत्राणामुत्तमोत्तमम् । उपदिष्टाश्च सर्वे त एकोरामाख्यसूरिणा ॥११४॥

---

[१०८] त्याप्रमाणेंच त्याच्या पश्चिम दिशेला पिवळ्या रंगाचा सद्योजातमुखात्मक कलश असावा [१०९] व नकार बीजमंत्र लिहावा. त्या बीजमंत्रावर कलशाची स्थापना करून तेथील आधिदैवत जो रेवणाराध्य त्याला साक्षी करावा [११०] त्याच्या उत्तर दिशेला वामदेवमुखात्मक लाल रंगाचा कलश असावा व त्याचा मकारबीजमंत्र लिहावा [१११] त्या मकार बीजमंत्राच्या ठिकाणीं वामदेवमुखात्मक कलशाची स्थापना करावी. अध्यक्ष जो मरुळाराध्य त्याला साक्षी करावा. [११२] यापुढें पार्वति, एकोरामाराध्याची लीला सांगतों त्याच्या लीलेनें तेरा उपसूत्रज्ञ उत्पन्न झाले व त्यांना [११३] आगमोक्त प्रकारानें ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं नमः शिवाय असा आठ वर्णांचा [११४] सूक्ष्मपंचाक्षर नांवाचा व सर्व मंत्रांमध्यें श्रेष्ठ अशा मंत्राचा एकोरामा-

नीललिंगं यतो दध्रुरतस्तन्मतवर्तिनः । एकोरामार्य एवासावघोरवदनोद्भवः ॥११५॥ भृंगिगोत्राधिनाथश्च सिंहासनपतिश्च सः । एकोरामार्यनामासौ जगद्गुरुत्तमश्च सः ॥११६॥ एभिस्त्रयोदशविधैरुपदिष्टाश्च सर्वशः । तेषां च तद्गुरूणां च लिंगधारणकर्मणि ॥११७॥ दीक्षोपदेशयोश्चैव विवाहादौ तथैव च । चरस्थापनपट्टाभिषेकेषु शुभकर्मसु ॥११८॥ निग्रहेऽनुग्रहे चैव आह्वाने च विसर्जने । एकोरामाराध्य एव मुख्यकर्ता गुरूत्तमः ॥११९॥ तस्मान्मन्मुखसंजाताः स्वतंत्राश्चेति विश्रुताः । तेभ्यो ये च समुत्पन्ना उपसूत्रास्त्रयोदश ॥१२०॥ अमुख्यास्तेऽप्यस्वतंत्रा

---

राध्यानें उपदेश दिला. [११५] एकोरामाराध्यानें जसें निळ्या रंगाचें लिंग धारण केलेलें आहे त्याप्रमाणेंच त्याच्या मताचें अवलंबन करणारे नीलवर्ण लिंग धारण करितात. एकोरामाराध्य हाच अघोरमुखापासून उत्पन्न झालेला आहे. [११६] वृषभ गोत्राचा अधिनाथ व सिंहासनपति जो एकोरामाराध्य नांवाचा तो श्रेष्ठ जगद्गुरु होय. [११७] ह्या तेरांकडूनच सर्व प्रकारें उपदेश दिला जातो, परंतु ह्या सर्व गुरूंमध्यें लिंग धारण क्रियेच्या वेळीं [११८] दीक्षा किंवा उपदेश द्यावयाचा असल्यास, लग्नकालीं, चरमूर्तीची स्थापना किंवा पट्टाधिकाऱ्यांना अभिषेक करावयाचा असल्यास, शुभ कार्यांच्या वेळीं [११९] त्याप्रमाणेंच अनुग्रह किंवा निग्रह करावयाचा असल्यास, आव्हान व विसर्जनवेळीं अघोरमुखापासून उत्पन्न झालेला एकोरामाराध्य गुरुवर हाच मुख्य कर्ता होय. [१२०] याकरितां माझ्या मुखांपासून जे उत्पन्न

महाचार्यानुगाश्च ते । तेभ्यश्चैवोपदिष्टास्तु सामान्या वीरशैवकाः ॥१२१॥ ते पंचमा इति ख्याता उपपूर्वास्तथेतरे ॥१२२॥

इति एकोरामार्यदीक्षाप्रकरणम् ।

---

झालेले आहेत त्यांनाच स्वतंत्र असें म्हटलेलें आहे, तेच स्वतंत्र हो[त] त्यांच्यापासून उत्पन्न झालेले जे तेरा उपसूत्रज्ञ [१२१] ते कोणत्या[ही] कार्यांत मुख्य किंवा स्वतंत्र नसून केवळ महाचार्याला अनुसरण[ारे] होत. जे वीरशैव लोक त्यांच्याकडून दीक्षा घेतात, ते सामान्य हो[त] [१२२] हे पंचम असून यांच्यापासून जे इतर झालेले आहेत त्यां[ना] उपपंचम म्हणतात.

येथें एकोरामाराध्याचार्यांचें दीक्षाप्रकरण संपलें.

श्रीजगद्गुरुपंचाचार्येभ्यो नमः



# सुप्रबोधागमे पंचाचार्योत्पत्तिः ॥

## पार्वत्युवाच ।

त्वया प्रोक्ताश्च भगवन्पंच पीठाधिदेवताः । स्वतंत्रा मुख्यगुरवो महांतश्चेति विश्रुताः ॥१२३॥ तथैवमस्वतंत्राणां प्रभेदं वक्तुमर्हसि । इत्येवं गिरिजापृष्टो भगवान् भूतभावनः ॥१२४॥ अस्वतंत्रगुरूणां च प्रभेदं वक्तुमारभत् ।

## ईश्वर उवाच ।

पूर्वं मद्वदनाज्जातस्तत्पुरुषाद्वेनुकर्णकः ॥१२५॥ लीलया चासृजत्सूत्रं मुक्तागुच्छं महत्तरम् । स एव पंडिताराध्यो भूत्वा

---

[१२३] पार्वती म्हणते–"हे भगवन्, आपण जे पांच पीठाधिकारी सांगितले, ते मोठे स्वतंत्र व मुख्य गुरु होत असें आपण म्हणतां [१२४] तर, त्याप्रमाणेंच जे स्वतंत्र नाहींत त्यांचे देखील भेद आपण मला कृपा करून सांगा." याप्रमाणें पार्वतीनें विचारल्यानंतर, सकल प्राणिमात्रांचा उत्पन्नकर्ता जो भगवान् परमेश्वर [१२५] त्यानें अस्वतंत्र

लीलामथाकरोत् ॥१२६॥ तल्लीलया समुत्पन्नान्युपसूत्राणि द्वादश । गोणीकंथा च दंती च जठरस्त्रिगुणस्तथा ॥१२७॥ केशकंथा ललाटश्च व्याघ्रकंथा तथैव च । लोचनं भगिनी चैव जालकंथा तथैव च ॥१२८॥ नटनं बद्दडिश्चैवं महासूत्रेण संयुताः । त्रयोदशविधाश्चैते पंडिताराध्यसंभवाः ॥१२९॥ एते सर्वेऽप्यस्वतंत्रा जाता अपि महात्मना ।

## पार्वत्युवाच ।

महाचार्येण संभूताः कथं तेऽप्यस्वतंत्रकाः ॥१३०॥ अस्वातंत्र्ये कारणं किमेतद्विस्तरतो वद ।

## ईश्वर उवाच ।

तत्पुरुषमुखोत्पत्तिराहित्येन तथैव च ॥१३१॥ तदास्यकलशस्यापि

---

गुरूंचे भेद सांगण्यास सुरवात केली. ईश्वर सांगतात, "प्रथम माझ्या तत्पुरुषमुखापासून धेनुकर्ण उत्पन्न झाला [१२६] त्यानें सहज लीलेनें मुक्तागुच्छ नांवाचें मोठें सूत्र उत्पन्न केलें. तोच पुढें पंडिताराध्य होऊन लीला करितां झाला [१२७] व त्या त्याच्या लीलेनें बारा उपसूत्रें उत्पन्न झालीं. गोणीकंथा, दंती, जठर, त्रिगुण [१२८] केश-कंथा, ललाट, व्याघ्रकंथा, लोचन, भागिनी, जालकंथा [१२९] नटन व बददी अशीं तीं बारा उपसूत्रें असून मुक्तागुच्छ नामक महासूत्रासह एकंदर तेरा होतात [१३०] हे सर्व जरी महात्म्या-पासूनच उत्पन्न झालेले आहेत तरी ते अस्वतंत्रच समजावेत" पार्वती विचारते—"महाचार्यापासून उत्पन्न झालेले असून ते स्वतंत्र नाहींत

शुभ्रवर्णमयस्य च । अधिकारित्वराहित्यादनीशास्योद्भवत्वतः ॥१३२॥ वृषगोत्राभिधानाच्च सप्तवर्णान्विते वरे । स्थूलपंचाक्षराख्ये च महामंत्रे परात्परे ॥१३३॥ उपदेष्टृत्वराहित्यादृगाद्यागमजातिषु । अधिकारित्वराहित्याद्वीरशैवालयेषु च ॥१३४॥ दीक्षालिंगोपदेशादिष्वकर्तारस्ततोऽभवन् ।

## पार्वत्युवाच ।

कथं कुर्वंत्यस्वतंत्रा वीरशैवालयेषु च ॥१३५॥ दीक्षोपदेशनं चैव लिंगधारणपूर्वकम् । एतद्विस्तरतो ब्रूहि लोकानुग्रहकांक्षया ॥१३६॥

## ईश्वर उवाच ।

त्रयोदशोपरुद्रज्ञा अस्वतंत्रा अपि स्वयम् । महारुद्राधिपतिना

---

हें कसें ? [१३१] व ते अस्वतंत्र असण्याला कारण काय ? हें सर्व विस्तारेंकरून आपण मला सांगा." ईश्वर सांगतात—"हे तत्पुरुष-मुखापासून प्रत्यक्ष उत्पन्न झालेले नाहींत व तसेंच [१३२] शुभ्रवर्ण-मय ( पांढऱ्या रंगाचा ) जो त्या तत्पुरुष मुखाचा कलश त्याचाही अधिकार यांना नाहीं. परमेश्वराच्या मुखापासून उत्पन्न झालेलें जें [१४३] वृषभगोत्र त्याच्या सप्तवर्णात्मक व श्रेष्ठ अशा स्थूल पंचाक्षर नांवाच्या महामंत्राचा [१३४] उपदेश यांना करितां येत नाहीं; व त्याप्रमाणेंच ऋग्वेदादि वेदागमांचा अधिकार यांना नसल्यामुळें वीरशैव लोकांचे घरीं [१३५] दीक्षा किंवा लिंगोपदेश इत्यादि कर्में यांना करितां येत नाहींत." पार्वती विचारते—"हे स्वतंत्र नसून वीरशैव

चोपदेशादनंतरम् ॥१३७॥ तदनुग्रहतस्तेषां गोत्रप्रवरवर्णकैः । कलशैर्मंत्रदंडाद्यैः कमंडलुसमन्वितैः ॥१३८॥ वीरशैवालयेष्वेते चास्वतंत्राः प्रवर्तकाः ।

## पार्वत्युवाच ।

त्रयोदशोपसूत्राणामुपदेशोऽभवत्कथम् ॥१३९॥ गुरुः कोऽभूत्साक्षिगः के को मंत्रः कलशश्च कः । किं बीजं किंविधं लिंगं कस्यां दिशि समाचरेत् ॥१४०॥ इतीशान्या च संपृष्टो भगवानब्रवीद्वचः ।

## ईश्वर उवाच ।

पंडिताराध्यसंजातास्त्रयोदशविधाश्च ये ॥१४१॥ उपसूत्रज्ञकास्ते-

---

लोकांच्या घरीं [१३६] लिंगधारणपूर्वक दीक्षा व उपदेश वगैरे कसा करितात? हें मला, भगवन्, तुह्मी आतां कृपा करून सविस्तरपणें लोकोपकारार्थ सांगा." [१३७] ईश्वर सांगतात—"तेरा उपसूत्रज्ञ हे जरी स्वतः स्वतंत्र असे नाहींत तरी महासूत्राधिपतींकडून उपदेश मिळाल्यानंतर [१३८] त्यांच्याच अनुग्रहानें गोत्र, प्रवर, वर्ण, कलश, दंड मंत्र, व कमंडलु यांसह [१३९] स्वतंत्र नसूनही वीरशैव लोकांचे घरीं दीक्षा उपदेशादि धर्मक्रिया चालवितात." पार्वती विचारते—"तेरा जीं उपसूत्रें आहेत त्यांना उपदेश कसा दिला जातो? [१४०] त्यांना गुरु कोण? साक्षी कोण कोण असतात? त्यांचा मंत्र कोणता? त्यांना कलश, बीजमंत्र व लिंग हीं कोणकोणतीं असतात? व त्यांची

षामुपदेशः प्रवक्ष्यते । पंडितार्यस्य शुभ्राभं तत्पुरुषमुखात्मकम् ॥१४२॥ कलशं तु वकाराख्यं मध्ये बीजं लिखेत्सुधीः । वकाराख्ये महाबीजे कलशं तं न्यसेत्ततः ॥१४३॥ अधिदैवं पंडितार्यं मध्ये संभावयेद्गुरुम् । तत्स्थाने प्राक्दिशिस्थं च पीतवर्णविशिष्टकम् ॥१४४॥ विश्वाराध्यात्मकं तत्र यकारं विलिखेत्ततः । यकाराख्ये महाबीजे कलशं तत्र विन्यसेत् ॥१४५॥ तत्राधिदैवतं विश्वाराध्यं कृत्वाथ साक्षिणम्। तत्स्थाने दक्षिणोपेतं सद्योजातमुखात्मकम् ॥१४६ नकारं च समालिख्य तस्योपरि करीरकम् । विन्यसेद्रेवणाराध्यं कृत्वा साक्षिणमव्ययम् ॥१४७॥

---

दिशा कोणती?" [१४१] याप्रमाणें पार्वतीनें विचारल्यांनतर भगवान् परमेश्वर तिला सांगूं लागतात. ईश्वर म्हणतात—"पंडिताराध्यापासून उत्पन्न झालेले जे तेरा [१४२] उपसूत्रज्ञ त्यांचा उपदेशविधि सांगतों. पंडिताराध्याला तत्पुरुषमुखात्मक शुभ्र [१०३] कलश असून त्याचा वकाराख्य बीजमंत्र लिहावा. वकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं कलशाची स्थापना करावी. [१४४] अधिदैवत जो पंडिताराध्य गुरु त्याची मध्यें संभावना करावी. त्याच्या पूर्वदिशेला निळ्या रंगाचा [१४५] विश्वाराध्यात्मक कलश असावा व तेथें त्याचा यकारमंत्र लिहावा. यकाराख्य महाबीज मंत्राच्याठिकाणीं कलशाची स्थापना करावी. [१४६] तेथील अधिदैवत विश्वाराध्य असून त्याला साक्षी करावा. त्याच्या दक्षिण दिशेला सद्योजातमुखात्मक [१४७] कलश असून नकार बीजमंत्र लिहावा व त्या नकार बीजमंत्राच्याठिकाणीं

तत्स्थाने पश्चिमदिशि विशिष्टं वामदेवकम् । रक्तवर्णसमायुक्तं मकारं विलिखेत्ततः ॥१४८॥ तस्योपरि न्यसेद्वामदेवात्मककरीरकम् । मरुळाराध्यमध्यक्षं साक्षीभूतं समादिशेत् ॥१४९॥ तत्स्थाने चोत्तरे कृष्णमघोरवदनात्मकम् । उत्तमोत्तमतायुक्तं कलशं विन्यसेत्ततः ॥१५०॥ शिकाराख्यं महामंत्रबीजं च विलिखेत्ततः । शिकाराख्ये महाबीजे तत्करीरं न्यसेद्बुधः ॥१५१॥ अधिदैवं चैकरामं साक्षीभूतं समाचरेत् । ततः परं प्रवक्ष्यामि पंडिताराध्यलीलया ॥१५२॥ समुद्भूतोपसूत्रज्ञास्त्रयोदशविधाश्च ये । उपदिष्टाश्च सर्वेऽपि पंडिताराध्यसूरिणा ॥१५३॥ वज्रलिंगं

---

कळशाची स्थापना करावी. रेवणाराध्य अधिदैवत याला साक्षी करावा. त्या नंतर [१४८] त्याच्या पश्चिम दिशेला वामदेवमुखात्मक तांबड्या रंगाचा कलश असावा व मकार बीजमंत्र लिहावा. [१४९] त्या मकार बीजमंत्राच्याठिकाणीं वामदेवात्मक कलशाची स्थापना करावी व मरुळाराध्य अध्यक्षाला साक्षीभूत करावा. [१५०] त्याच्या उत्तर दिशेला कृष्णवर्णमय ( काळ्या रंगाचा ) अघोरवर्णात्मक कलश ठेवावा. [१५१] व शिकाराख्य महाबीजमंत्र लिहावा. नंतर शिकाराख्य महाबीजमंत्राच्याठिकाणीं कलशाची स्थापना करावी. [१५२] तेथील अधिदैवत जो एकोरामाराध्य त्याला साक्षी करावा. यापुढें पार्वति, पंडिताराध्याची लीला सांगतों. त्याच्या लीलेनें [१५३] तेरा उपसूत्रज्ञ उत्पन्न झाले व त्या सर्वांना पंडिताराध्य गुरूनें उपदेश दिला [१५४] पंडिताराध्यानें वज्रलिंग धारण केलेलें आहे व त्याप्रमाणेंच त्याच्या

ततो दध्रुस्तन्मतालंबनाश्च ते । त्रयोदशानामेतेषां तत्पुरुषमुखोद्भवः ॥१५४॥ वृषगोत्राधिनाथश्च सिंहासनपतिश्च सः । पंडिताराध्यसन्नामा जगद्गुरूत्तमश्च सः ॥१५५॥ एभिस्त्रयोदशविधैरुपदिष्टाश्च सर्वशः । तेषां च तद्गुरूणां च लिंगधारणकर्मणि ॥१५६॥ दीक्षोपदेशयोश्चैव विवाहादौ तथैव च । चरस्थापनपट्टाभिषेकेषु शुभकर्मसु ॥१५७॥ निग्रहेऽनुग्रहे चैव आह्वाने च विसर्जने । पंडिताराध्य एवासौ मुख्यकर्ता गुरूत्तमः ॥१५८॥ तस्मान्मन्मुखसंजाताः स्वतंत्राश्चेति विश्रुताः । तेभ्य एव समुत्पन्ना उपसूत्रास्त्रयोदश ॥१५९॥ अमुख्यास्तेऽप्यस्वतंत्रा महाचार्यानुगाश्च

---

मताचें अवलंबन करणारे वज्रलिंग धारण करितात. हे तेरा उपसूत्रज्ञ तत्पुरुषमुखापासून उत्पन्न झालेला आहेत. [१५५] वृषभ गोत्राचा अधिनाथ व सिंहासनपति जो पंडिताराध्य नांवाचा तो श्रेष्ठ जगद्गुरु होय. [१५६] ह्या तेरांकडूनच सर्व प्रकारें उपदेश दिला जातो; परंतु ह्या सर्व गुरूंमध्यें लिंग धारण क्रियेच्यावेळीं [१५७] दीक्षा किंवा उपदेश द्यावयाचा असल्यास, लग्नकालीं त्याप्रमाणेंच चरमूर्तीची स्थापना किंवा पट्टाधिकाऱ्यांना अभिषेक करावयाचा असल्यास, शुभ कार्यांच्या वेळीं [१५८] तसेंच निग्रह किंवा अनुग्रह करावयाचा असल्यास, आव्हान व विसर्जन करावयाचे वेळीं (तत्पुरुषमुखापासून उत्पन्न झालेला) पंडिताराध्य गुरुवर हाच मुख्य कर्ता. [१५९] याकरितां माझ्या मुखांपासून (प्रत्यक्ष) जे उत्पन्न झालेले आहेत त्यांनाच स्वतंत्र असें म्हटलेलें आहे (तेच स्वतंत्र होत) त्यांच्यापासून

ते । तेभ्यश्चैत्रोपदिष्टास्तु सामान्या वीरशैवकाः ॥१६०॥ ते पंचमा इति ख्याता उपपूर्वास्तथेतरे ॥१६१॥

इति पंडिताराध्यदीक्षाप्रकरणम् ।

---

उत्पन्न झालेले जे तेरा उपसूत्रज्ञ [१६०] ते कोणत्याही कार्यांत मुख्य किंवा स्वतंत्र नसून केवळ महाचार्याला अनुसरणारे होत. जे वीरशैव लोक त्यांच्याकडून दीक्षा घेतात ते सामान्य होत. [१६१] हे पंचम असून यांच्यापासून जे इतर झालेले आहेत त्यांना उपपंचम म्हणतात.

ह्याप्रमाणें पंडिताराध्याचें दीक्षाप्रकरण संपलें.

श्रीजगद्गुरुपंचाचार्येभ्यो नमः



# सुप्रबोधागमे पंचाचार्योत्पत्तिः ॥

## पार्वत्युवाच ।

देवदेव जगन्नाथ जगदानंदवर्धन ॥१६२॥ पंचसिंहासनाधीशाः स्वतंत्रा मुख्यकारिणः । तैर्लीलया समुद्भूता अस्वतंत्राश्च द्वादश ॥१६३॥ तथैवमस्वतंत्राणां प्रभेदं वक्तुमर्हसि । इत्येवं गिरिजा-पृष्टो भगवान् भूतभावनः॥ १६४॥ अस्वतंत्रगुरूणां च प्रभेदं वक्तुमारभत् ।

## ईश्वर उवाच ।

पूर्वं मम मुखाज्जात ईशानाद्विश्वकर्णकः ॥१६५॥ लीलया पंच-

---

[१६२] पार्वती म्हणते—"हे सकल जगताला आनंद देणाऱ्या देवाधिदेवा जगन्नायका! [१६३] पंचसिंहासनाधीश्वर हे स्वतंत्र व मुख्यकर्ते असे असून त्यांच्या लीलेनें उत्पन्न झालेले बारा (उपसूत्रज्ञ) अस्वतंत्र होत. [१६४] तर, जे स्वतंत्र नाहींत त्यांचे देखील भेद आपण मला कृपा करून सांगा." याप्रमाणें पार्वतीनें विचारल्यानंतर, सकल प्राणिमात्रांचा उत्पन्नकर्ता जो भगवान् परमेश्वर [१६५] त्यानें

वर्णाख्यं महासूत्रमसीसृजत् । विश्वाराध्यः स एवाभूत् सोऽपि लीलामथाकरोत् ॥१६६॥ तल्लीलया समुत्पन्नाः कंबलो वृषभस्तथा । दशाननो जरत्कंथा पंचवक्त्रो गुहाग्रकः ॥१६७॥ गोचरो गगनं चैव मुसली लगुडस्तथा । शिथिली पाशुपत्यं च पंचवर्णेन संयुताः ॥ १६८ ॥ त्रयोदशविधाश्चैते महाचार्यसमुद्भवाः । अस्वतंत्रा इति प्रोक्ता अमुख्याः सर्वकर्मसु ॥१६९॥

## पार्वत्युवाच ।

महाचार्येण संभूताः कथं तेऽप्यस्वतंत्रकाः । अस्वातंत्र्ये कारणं किमेतद्विस्तरतो वद ॥१७०॥

## ईश्वर उवाच ।

ईशानाख्यमुखोत्पत्तिराहित्याच्च तथैव च । तदास्यकलशस्यापि

---

अस्वतंत्र गुरूंचे भेद सांगण्यास सुरवात केली. ईश्वर सांगतात, "प्रथम माझ्या ईशानमुखापासून विश्वकर्ण उत्पन्न झाला [१६६] त्यानें सहज लीलेनें पंचवर्ण नांवाचें मोठें सूत्र उत्पन्न केलें. तोच पुढें विश्वाराध्य होऊन लीला करितां झाला. [१६७] व त्या त्याच्या लीलेच्या योगानें (बारा उपसूत्रें उत्पन्न झालीं.) कंबल, वृषभ, दशानन, जरत्कंथा, पंचवक्त्र, गुहाग्रक, [१६८] गोचर, गगन, मुसली, लगुड, शिथिल व पाशुपत्य (अशीं तीं बारा उपसूत्रें असून) पंचवर्ण महासूत्रासह [१६९] एकंदर तेरा होतात. हे सर्व महाचार्यापासूनच उत्पन्न झालेले आहेत, तथापि ते कोणत्याही क्रियेच्यावेळीं स्वतंत्र किंवा मुख्य नसतात." [१७०] पार्वती विचारते,– "महाचार्यापासून उत्पन्न झालेले

पीतवर्णमयस्य च ॥१७१॥ अधिकारित्वराहित्यादनीशास्योद्भवत्वतः । स्कंदगोत्राभिधानाच्च षडक्षरसमन्विते ॥१७२॥ मूलपंचाक्षराख्ये च महामंत्रे परात्परे । उपदेष्टृत्वराहित्यादृगाद्यागमजातिषु ॥१७३॥ अधिकारित्वराहित्याद्वीरशैवालयेषु च । दीक्षालिंगोपदेशादिष्वकर्तारस्ततोऽभवन् ॥१७४॥

## पार्वत्युवाच ।

कथं कुर्वंत्यस्वतंत्रा वीरशैवालयेषु च । दीक्षोपदेशनं चैव लिंगधारणपूर्वकम् ॥१७५॥ एतद्विस्तार्य भगवन् वक्तुमर्हसि सांप्रतम् ।

## ईश्वर उवाच ।

त्रयोदशोपसूत्रज्ञा अस्वतंत्रा अपि स्वयम् ॥१७६॥ महासूत्राधि-

---

असून ते स्वतंत्र नाहींत हें कसें ? व ते अस्वतंत्र असण्याला कारण काय ? हें सर्व विस्तारेंकरून आपण मला सांगा." [१७१] ईश्वर सांगतात—"हे पार्वती, ईशानमुखापासून त्यांची उत्पत्तीझालेली नसल्यामुळें, त्यांना पिवळ्या रंगाच्या [१७२] कलशाचा अधिकार नसल्यामुळें, ईश्वर मुखापासून उत्पत्ती नसल्यामुळें आणि स्कंदगोत्राचें नांव सांगत असल्यामुळें षडक्षरांनींयुक्त अशा [१७३] मूलपंचाक्षर महामंत्राचा उपदेश यांना करितां येत नाहीं; व तसेंच ऋग्वेदादि वेदागमांचा अधिकार यांना नसल्यामुळें वीरशैव लोकांचे घरीं [१७४] दीक्षा किंवा लिंगोपदेश इत्यादि कर्में यांना करितां येत नाहींत." [१७५] पार्वती विचारते—"हे स्वतंत्र नसून वीरशैव लोकांच्या घरीं [१७६] लिंगधारणपूर्वक दीक्षा व उपदेश वगैरे कसा

पतिना चोपदेशादनंतरम् । तदनुग्रहतस्तेषां गोत्रप्रवरवर्णकैः ॥१७७॥ कलशैर्दंडमंत्राद्यैः कमंडलुसमन्वितैः । वीरशैवालयेष्वेते चास्वतंत्राः प्रवर्तकाः ॥१७८॥

## पार्वत्युवाच ।

त्रयोदशोपसूत्राणामुपदेशोऽभवत्कथम् । गुरुः कोऽभूत्साक्षिणः के मंत्रः कः कलशश्च कः ॥१७९॥ किं बीजं किंविधं लिंगं कस्यां दिशि समाचरेत् । इतीशान्या च संपृष्टो भगवान-ब्रवीद्वचः ॥१८०॥

## ईश्वर उवाच ।

त्रिश्वाराध्यसमुद्भूतास्त्रयोदशविधाश्च ये । उपसूत्रज्ञकास्तेषामुप-

---

करितात? हें मला, भगवन्, तुह्मी आतां कृपा करून सविस्तरपणें सांगा." ईश्वर सांगतात– "हे तेरा उपसूत्रज्ञ जरी स्वतः अस्वतंत्र आहेत तरी [१७७] महासूत्राधिपतीनें त्यांस उपदेश दिल्यानंतर त्यांच्याच कृपेनें गोत्र, प्रवर, वर्ण, [१७८] व कमंडलुसहित कलश, दंड मंत्र, वगैरेनीं हे अस्वतंत्र लोक वीरशैवालयांत स्वतंत्रपणानें काम चालवितात." [१७९] पार्वती म्हणते– "ह्या तेरा उपसूत्रांनाउपदेश कसा होतो? ह्यांचा गुरु कोण? साक्षी कोण? मंत्र कोणते? व कलश कोणत्या रंगाचा असतो? [१८०] त्यांचा बीजमंत्र काय? लिंग कोणत्या रीतीचें असतें? व कोणत्या दिशेस हा विधि करावा लागतो?" असें पार्वतीनें विचारल्यानंतर ईश्वर सांगूं लागले. ईश्वर

देशः प्रवक्ष्यते ॥१८१॥ विश्वाराध्यं स्वर्णवर्णमीशानवदनात्मकम् । कलशं मध्यमं बीजं यकारं विलिखेत्ततः ॥१८२॥ यकाराख्ये महाबीजे कलशं विन्यसेद्बुधः । विश्वाराध्यार्यमध्यक्षं मध्ये संभावयेद्गुरुम् ॥१८३॥ तत्स्थाने पूर्वदिक्संस्थं हरिद्वर्णविराजितम् । सद्योजातात्मकं तत्र नकारं विलिखेत्ततः ॥१८४॥ नकाराख्ये महाबीजे तत्करीरं न्यसेद्बुधः । तत्राधिदैवतं चैव रेवणाराध्यनामकम् ॥१८५॥ तत्स्थाने दक्षिणोपेतं रक्तवर्णविराजितम् । वामदेवात्मकं तत्र मकारं विलिखेत्ततः ॥१८६॥ मकाराख्ये महाबीजे कलशं विन्यसेत्ततः । तत्राधिदैवतं कृत्वा मरुळाराध्यनामकम् ॥१८७॥ साक्षीभूतं विदित्वा तं तथैव च ततः परम् ।

---

[१८१] म्हणतात—"हे अस्वतंत्र विश्वाराध्यापासून उत्पन्न झाले. व ह्यांचे तेरा भेद आहेत ह्या उपसूत्रज्ञकांचा उपदेश सांगतों. [१८२] विश्वाराध्य गुरु सुवर्णासारखा पिवळ्या रंगाचा असून तो ईशानमुखापासून उत्पन्न झालेला आहे. म्हणून मध्यें कलश ठेवून त्यावर "य" कार हें बीजाक्षर लिहावें. [१८३] यकाराक्षर हा महाबीजमंत्र होय त्यावर शहाण्यानें कलश ठेवावा आणि विश्वाराध्य गुरूला अध्यक्षस्थान (मुख्यस्थान) देऊन त्या गुरूची त्यामध्यें स्थापना करावी. [१८४] त्याचठिकाणीं पूर्वदिशेकडे हिरव्या रंगामुळें शोभणारा सद्योजातमंत्रात्मक नकार तेथें लिहावा. [१८५] त्या नकार महाबीजावर शहाण्यानें तो कलश ठेवावा. त्याचें तेथें मुख्यदैवत रेवणाराध्य नांवाचें होय असें समजावें. [१८६] त्याचे दक्षिणेकडील बाजूस लाल रंगामुळें शोभणारा वामदेवस्वरूपी तेथें मकार लिहावा. [१८७] त्या मकार महाबीजावर

तत्स्थाने पश्चिमोपेतं कृष्णवर्णविराजितम् ॥१८८॥ अघोरास्यात्मकं तत्र शिकारं विलिखेत्ततः । शिकाराख्ये मंत्रबीजे कलशं स्थापयेत्सुधीः ॥१८९॥ तत्राधिदैवतं चैव एकोरामाख्यकं परम् । साक्षीभूताधिदैवं तं निर्माय च ततः परम् ॥१९०॥ तत्स्थाने चोत्तरोपेतं तत्पुरुषमुखात्मकम् । वज्रकांतिसमोपेतं कलशं पंडिताभिधम् ॥१९१॥ वकारं च लिखित्वा तु तस्योपरि करीरकम् । विन्यस्य पंडिताराध्यं भावयेत्साक्षिकं गुरुम् ॥१९२॥ ततः परं प्रवक्ष्यामि विश्वाराध्यस्य लीलया । समुद्भूतोपसूत्रज्ञास्त्रयोदशविधाश्च ते ॥१९३॥ आगमोक्तविधानेन षडक्षरसमन्वितम् । मूलपंचाक्षरं मंत्रमुपदिष्टाः पृथक् पृथक् ॥१९४॥ विश्वाराध्येन

---

नंतर कलश ठेवावा व त्यावर मरुळाराध्य नांवाचे आचार्यास मुख्य दैवत करावें. [१८८] तो मरुळाराध्य साक्षीभूत आहे असें समजून तसेंच त्यानंतर त्याठिकाणीं पश्चिमेकडील बाजूस काळ्या रंगामुळें सुशोभित दिसणारा [१८९] अघोरास्यात्मक "शि" कार तेथें लिहावा. त्या "शि" कार नांवाच्या मंत्रबीजावर शहाण्यानें कलश ठेवावा. [१९०] व त्यावर एकोराम नांवाच्या गुरूस मुख्य दैवत करून त्यास तेथें साक्षीभूत करावें. इतकें झाल्यावर [१९१] त्याठिकाणीं उत्तर दिशेला तत्पुरुषमुखस्वरूपी वज्रासारखा रंग असणारा पंडिताराध्यरूप कलश ठेवावा. [१९२] व तेथें "व" कार लिहून त्यावर ठेवलेल्या कलशावर पंडिताराध्यास मुख्य दैवत करून पंडिताराध्य गुरूला साक्षीभूत करावें. [१९३] त्यानंतरचा पुढील प्रकार सांगतों. विश्वाराध्याच्या लीलामात्रानें हे तेरा प्रकारचे उपसूत्रज्ञ उत्पन्न झाले

गुरुणा ज्योतिलिंगमदीधरन् । अथ सर्वोपसूत्रज्ञास्तन्मतालंबनाश्च ते ॥१९५॥ पंचवर्णश्च कंबालो वृषभो दशवक्त्रकः । जरत्कंथा पंचमुखो गुहाग्रो गोचरश्च सः ॥१९६॥ गगनं मुसली चेति लगुडः शिथिली तथा । पाशुपत्यं महासूत्रसंयुक्तास्ते त्रयोदश ॥१९७॥ एवं भेदवतामेषामूर्ध्वेशानास्यसंभवः । स्कंदगोत्राधिनाथश्च महासिंहासनाग्रणीः ॥१९८॥ विश्वाराध्य इति ख्यातो जगद्गुरुत्तमश्च सः । एभिस्त्रयोदशविधैरुपदिष्टाश्च सर्वशः ॥१९९॥ तेषां चैव गुरूणां च लिंगधारणकर्मणि । दीक्षोपदेशयोश्चैव विवाहादौ तथैव च ॥२००॥ चरस्थापनपट्टाभिषेकेषु शुभकर्मसु । निग्रहेऽनुग्रहे चैव आह्वाने च विसर्जने ॥२०१॥ ईशानवदनोद्-

---

[१९४] त्यांस आगमांत सांगितलेल्या रीतीप्रमाणें सहा अक्षरांनींयुक्त असणारा मूळ पंचाक्षरी मंत्र वेगवेगळ्या रीतीनें सांगितला. [१९५] विश्वाराध्य गुरूमुळें मग ते सर्व त्यांच्या मताचाच स्वीकार करणारे उपसूत्रज्ञ ज्योतिर्लिंग धारण करूं लागले. [१९६] त्या तेराजणांच्या महासूत्रांचीं नांवें पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत. पंचवर्ण, कंबाल, वृषभ, यशवक्त्रक, जरत्कंथा, पंचमुख, गुहाग्र, गोचर, [१९७] गनन, मुसली, लगुड, शिथिली, पाशुपत्य हीं त्यांचीं महासूत्रें होत. [१९८] ह्याप्रमाणें भेद असणाऱ्या ह्या उपसूत्रज्ञांचा ऊर्ध्वेशानाच्या मुखापासून उत्पन्न झालेला, स्कंद गोत्राचा मुख्य व महासिंहासनाचा प्रमुख (चक्रवर्ती) [१९९] विश्वाराध्य अशा नांवाचा श्रेष्ठ जगद्गुरु होय, त्यानें ह्या तेरा उपसूत्रज्ञांस उपदेश केला व नंतर त्यांनीं आपल्या शिष्य परंपरेस उपदेश केला. [२००] त्यांच्या गुरूंच्या लिंगधारणे-

भूतो विश्वाराध्यश्च मुख्यकः । स्वतंत्रो गुरुराख्यात आचार्योऽभू-द्धरातले ॥२०२॥ तस्मान्मन्मुखसंजाताः स्वतंत्राश्चेति विश्रुताः । तेभ्य एव समुत्पन्ना उपसूत्रास्त्रयोदश ॥२०३॥ अमुख्यास्तेऽप्य-स्वतंत्रा महाचार्यानुगाश्च ते । तेभ्यश्चैवोपदिष्टास्तु सामान्या वीरशैवकाः ॥ २०४ ॥ ते पंचमा इति ख्याता उपपूर्वास्त-थेतरे ॥२०५॥

इति विश्वाराध्यदीक्षाप्रकरणम् ।

---

च्यावेळीं, दीक्षा व उपदेश द्यावयाच्यावेळीं, लग्न कार्याच्यावेळीं, तसेंच [२०१] चरस्थापन, पट्टाभिषेक वगैरे मंगल कृत्यांचेवेळीं, निग्रह, अनुग्रह, आव्हान, विसर्जन वगैरे करणें झाल्यास त्या त्या वेळीं [२०२] ईशानमुखापासून उत्पन्न झालेला विश्वाराध्य गुरूच मुख्य दैवत आहे. हा स्वतंत्र असून सर्व पृथ्वीवर आचार्य ह्या नांवानें प्रसिद्ध झाला. [२०३] ह्यास्तव माझ्या मुखांपासून उत्पन्न झाले म्हणून हे स्वतंत्र ह्या नांवानें प्रसिद्ध झाले व त्यांचेपासून हे तेरा उपसूत्रज्ञ उत्पन्न झाले. [२०४] हे अमुख्य (कमी योग्यतेचे) असून अस्वतंत्र आहेत व महाचार्यांच्या आज्ञेप्रमाणें वागणारे आहेत. त्यांचे-पासून उपदेश घेणारे ते सामान्य वीरशैव होत. [२०५] ते पंचम ह्या नांवानें प्रसिद्ध असून तसेच दुसरे उपपंचम नांवानें प्रसिद्ध आहेत.

ह्याप्रमाणें विश्वाराध्याचें दीक्षा प्रकरण संपलें.

श्रीजगद्गुरुपंचाचार्येभ्यो नमः



# सुप्रबोधागमे पंचाचार्योत्पत्तिः ॥

## पार्वत्युवाच ।

गुरवस्ते पंचविधास्त्वदाननसमुद्भवाः । तेषां गोत्रं पृथक् चैव तेषां वर्णादिकं पृथक् ॥२०६॥ तेषां कमंडलुश्चैव तेषां दंडः पृथक् पृथक् । तेषां च कलशं चैव मंत्रबीजं पृथक् पृथक् ॥२०७॥ तल्लीलया समुद्भूता उपसूत्रास्त्रयोदश । तेषां प्रभेदं च तथा तैस्तैः कार्यैः पृथक् पृथक् ॥२०८॥ इत्येतत्सर्वमाख्यातं प्रमेयं विदितं मया । सामान्यवीरशैवानां वीरशैवक्रियावताम् ॥२०९॥ एते

---

[२०६] पार्वती म्हणते–ईश्वरा, तुमचे मुखापासून उत्पन्न झालेले पांच प्रकारचे गुरु प्रसिद्ध आहेत त्यांचें वेगळें गोत्र, त्यांचे वेगवेगळे वर्ण वगैरे [२०७] त्यांचा कमंडलु वेगळा, त्यांचा दंड वेगळा, त्यांचा कलश वेगळा, त्यांचें मंत्रबीजही वेगवेगळें [२०८] त्यांच्या लीलेनें (कर्तबगारीनें,) उत्पन्न झालेले तेरा उपसूत्रज्ञ हे वेगवेगळे, त्यांच्या जाति व कार्यंही वेगवेगळीं आहेत [२०९] असें आपण मला सांगितलें व तें सर्व मलाही पण समजलें. आतां वीरशैवांचा आचार

त्रयोदशविधा उपसूत्रज्ञकाश्च ये । वयं गुरव इत्येवं संवदंत्यभिमानतः ॥२१०॥ तेषां गुरुत्वं सर्वेष्वप्यागमेषु प्रमाणितम् । कथं प्राप्तं वद ब्रह्मन् देव देव जगत्पते ॥२११॥ इति शैलात्मजापृष्टो भगवानब्रवीद्वचः ।

## ईश्वर उवाच ।

पंचानां च महार्याणां जाता ये लीलया प्रिये ॥२१२॥ ते सर्वे वीरशैवानां दीक्षायां लिंगधारणे । उपदेशे विवाहे च गौणतो गुरवः स्मृताः ॥२१३॥ गुरूणां लक्षणं चैव शिक्षारक्षणयोस्तथा । आह्वाने च विसर्गे च यः स्वतंत्रः स वै गुरुः ॥२१४॥ आह्वाने

---

पाळणाऱ्या इतर सर्व वीरशैवांचे [२१०] हे जे तेरा प्रकारचे उपसूत्रज्ञ आहेत ते लोक आम्ही गुरु आहोंत असें अभिमानानें बोलतात [२११] त्यांना सर्व आगमांमध्यें गुरुपण कसें मिळालें? हें सांगा. आपण ब्रह्मवेत्ते असून सर्व देवांचे देव आहां, व त्रैलोक्याचे ईश्वर आहां. [२१२] ह्याप्रमाणें हिमालय पर्वताच्या मुलीनें (पार्वतीनें) विचारल्यावर ईश्वर म्हणूं लागले,

हे प्रिये,–' पांच महाचार्यांच्या लीलेमुळें उत्पन्न झालेले [२१३] जे हे तेरा प्रकारचे सर्व उपसूत्रज्ञ ते वीरशैवांच्या दीक्षेच्यावेळीं, लिंगधारणेच्यावेळीं, उपदेशाचेवेळीं विवाहाच्यावेळीं, गौणपक्षानें गुरु मानले जातात. [२१४] गुरूचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे शिक्षा करण्याचे कामांत, रक्षण करण्याचे कामांत, आव्हान करण्याचे कामांत किंवा विसर्जन करण्याचे कामांत ज्यास पूर्णपणे स्वतंत्रता असेल तो

च विसर्गे चाप्यसमर्थाश्च ते परम् । सर्वेषां ब्राह्मणादीनां यथा गेहे पुरोहिताः ॥२१५॥ तद्वत्सामान्यशैवानां गृहेष्वेते पुरोहिताः । तेषां ते मूलगुरवः पीठाधिपतयश्च ये ॥२१६॥ न तेषां सत्यशीलानामुपमानाः पुरोहिताः । पंचानां च महार्याणां तच्छिष्याणां तथैव हि ॥२१७॥ सामान्यभावतः पूजां ये कुर्वंति नराधमाः । पूजाकर्ता पूजितश्च नरकानेव विंदति ॥२१८॥ मत्पंचवदनोद्भूताः सर्व एव गुरूत्तमाः । तत्सृष्टानां च सर्वेषां तत्सामर्थ्यं कथं भवेत् ॥२१९॥ ब्रह्मविष्णुमहेशाद्या मदाज्ञाधारकाश्च ते । हित्वा मदाज्ञां सृष्ट्यादिकर्तृत्वं च कथं भवेत् ॥२२०॥ लोके सर्वपतंगानां पक्षित्वं वर्ततेऽनघे । एतावता खगपतेः समानाः करटा न

---

गुरु होय. [२१५] आव्हानाच्यावेळीं आणि विसर्जनाचेवेळीं ते सर्वतोपरी असमर्थ आहेत. सर्व ब्राह्मण लोकांचे घरीं जसे उपाध्याय असतात. [२१६] तसेंच सामान्य शैवांच्या घरीं हे अस्वतंत्र उपाध्याय होत. त्यांचे जे पीठाधिकारी आहेत ते मूलगुरु होत. [२१७] त्या सत्य स्वभावांच्या पीठाधिकाऱ्यांची बरोबरी उपाध्याय लोकांच्यानें करवणार नाहीं. त्या पांच महाचार्यांची व तसेंच त्यांच्या शिष्यांची [२१८] सारखेपणानें जे अधम मनुष्य पूजा करितात, तो पूजा करणारा व पूजा करून घेणारा दोघेही नरकास जातात. [२१९] माझे पांच तोंडापासून जे उत्पन्न झाले ते पांचजण सर्वच उत्तम गुरु होत. त्यांनीं उत्पन्न केलेल्या सर्वांस त्या पांचजणांची योग्यता कशी येईल? [२२०] ब्रह्मा, विष्णु, महेश्वर वगैरे ते सर्व माझे आज्ञेप्रमाणें चालणारे

  

हि ॥२२१॥ सर्वेषां मृगजातीनां मृगत्वं वर्तते शिवे । कंठीरवस्य मार्जालः समो न हि महीध्रजे ॥२२२॥ लोके सर्वशिलानां च शिलात्वं वर्ततेऽम्बिके । चिंतामणिः शर्कराया लवणं न कदाचन ॥२२३॥ राज्ञां राजसुतानां च शिक्षारक्षणकर्मसु । राजैव हि समर्थः स्यात्पुत्राणां न कदाचन ॥२२४॥ सर्वेषां भूरुहाणां च वृक्षत्वं वर्ततेऽगजे । तथापि कल्पवृक्षस्य बर्बूरास्तु समा न हि ॥२२५॥ तथा गौणगुरूणां च प्रभावः शिष्यजातिषु । न कदाचिन्मया दृष्टो न श्रुतः शैलकन्यके ॥२२६॥ तस्मात्पंचाविधाचार्याः पंच पीठाधिदेवताः । पंच सिंहासनाधीशा जगद्गुरुतमाश्च

---

आहेत, माझे आज्ञेस सोडून त्यांचेकडून सृष्टी उत्पन्न करणें वगैरे काम कसें होईल? [२२१] हे निष्पापे, (पतिव्रते) जगांत सर्व जातींच्या पांखरांना पांखरूं असा शब्द लावितां येतो, तरीपण एवढ्यावरून गरुडाची बरोबरी कावळ्याच्यानें करवणार नाहीं. [२२२] पार्वती, सर्व जातींच्या जनावरांस सामान्य रीतीनें जनावर हा शब्द लावितां येतो परंतु सिंहाची बरोबरी मांजराच्यानें करवत नाहीं. [२२३] अंबिके, जगांत सर्व ठिकाणच्या दगडांना दगड असा सामान्यपणानें शब्द वापरतां येतो तरी चिंतामणि रत्नाची बरोबरी वाळूच्या खड्याच्यानें करवत नाहीं. ]२२४] राजाला आणि राजपुत्राला सामान्यपणें राजा असा शब्द लावितां येतो परंतु प्रजेस शिक्षा करणें व प्रजेचें रक्षण करणें हीं कामें राजाच करूं शकतो, राजपुत्राच्या हातून हीं कामें होणार नाहींत. [२२५] पार्वति, सर्व जातींच्या झाडांना झाड असा

ते ॥२२७॥ पंचकैरेभिरुद्भूतास्तत्तत्सूत्रानुसारिणः । पंचसृष्टि-विधाश्चैते पंचकानां महात्मनाम् ॥२२८॥ कलशैर्दंडमंत्राद्यैर्गोत्र-प्रवरवर्णकैः । एतादृशैर्लक्षणैस्तु समुपेतं स्वसूत्रपम् ॥२२९॥ गुरुं संभाव्य त्वन्योन्यैः साक्षीकृत्य ततः परम् । दीक्षोपदेशनं चैव लिंगधारणपूर्वकम् ॥२३० तत्तन्मुद्रानुसारेण कुर्वंत्येते महीतले । तत्तच्छिष्यसमूहानां तत्तज्ज्ञानानुसारिणाम् ॥२३१॥ पंचपीठा-धिदेवानां ये जानंति समानताम् । ते गर्दभाश्च संप्रोक्ता ज्ञानशू-न्यत्वतः शिवे ॥२३२॥ तस्मात्तस्माच्च गिरिजे पंचाननसमुद्भवाः । मदादिसर्वलोकानां जगद्गुरुवरोत्तमाः ॥२३३॥ तस्मात्स्वतंत्रकर्ता-

---

सामान्यपणें शब्द वापरतां येतो तरी पारिजाताची बरोबरी बाभळीचें झाडास येत नाहीं. [२२६] त्याप्रमाणें पार्वति, गौण गुरूंचें सामर्थ्य शिष्य जातीमध्यें असलेलें मीं कधीं पाहिलेंही नाहीं व ऐकिलेंही पण नाहीं, [२२७] त्यामुळें पांच आचार्य, पांच पीठांचे मुख्य अधिकारी, पांच सिंहासनांचे अधिकारी उत्तम रीतीचे जगद्गुरु होत. [२२८] ह्या गुरु पंचकांपासून उत्पन्न झालेले व त्या त्या सूत्राप्रमाणें वर्तन करणारे ते पंचमहात्म्याचे पंचविध सृष्टि करणारे होत. [२२९] कलश, दंड, मंत्र वगैरे, तसेंच गोत्र, प्रवर, वर्ण वगैरे अशा रीतीच्या लक्षणांनींयुक्त असणाऱ्या आपापल्या सूत्रपतीस [२३०] गुरूंचे जागीं संभावना करून व इतरांस साक्षीदार करून त्यानंतर लिंगधारण अगोदर करून दीक्षा उपदेश वगैरे [२३१] त्या त्या मुद्रांच्या अनुरोधानें त्यांचे शिष्य अस्वतंत्र पृथ्वीवर वर्तन करितात. त्यांच्या त्यांच्या ज्ञानाचे अनुरोधानें

रस्तज्जाताश्चोपसूत्रकाः । अमुख्यास्तेप्यस्वतंत्राः सत्यमेतन्मयोदि-तम् ॥२३४॥

इत्यस्वतंत्रगुरुनिरूपणम् समाप्तम्.

---

वागणाऱ्या त्यांच्या त्यांच्या शिष्यसमुदायांची [२३२] व पंचपीठाधि-देवतांची जे लोक बरोबरी करितात, पार्वति, त्यांना कांहींच शहाणपण नसल्यामुळें ते गाढवच म्हणावेत. [२३३] ह्यास्तव हे पार्वति, पांच मुखांपासून उत्पन्न झालेले ते पांच पीठाधीश्वर माझ्यासहित सर्व लोकांचे उत्तम जगद्गुरु होत. [२३४] त्यामुळेंच ते स्वतंत्र कर्ते होत व त्यापासून उत्पन्न झालेले ते उपसूत्रक से गौण असून अस्वतंत्र होत हें मीं सांगितलेलें खरें आहे.

अशा रीतीनें अस्वतंत्र गुरूचें वर्णन झालें.

॥ श्रीशिवाय नमः ॥

सुप्रबोधागमांत सांगितल्याप्रमाणें पंचाचार्यांची उत्पत्ति, गोत्र, सूत्र, शाखा वगैरेंचा सारांश.

| परमेश्वराचीं पांच मुखें. | सद्योजात. | वामदेव | अघोर | तत्पुरुष | ईशान |
|---|---|---|---|---|---|
| परमेश्वराच्या पांच मुखांपासून पांच-जण आचार्य उत्पन्न झाले त्यांचीं नांवें. | रेवणाराध्य. | मरुळाराध्य. | एकोरामाराध्य. | पंडिताराध्य | विश्वाराध्य |
| त्यांची जन्मभूमि. | कुल्यपाक क्षेत्रांत सोमेश लिंगापासून जन्म. | वटक्षेत्रांत सिद्धेश लिंगापासून जन्म. | द्राक्षाराम क्षेत्रांत रामनाथ लिंगापासून जन्म. | सुधाकुंड क्षेत्रांत श्री मल्लिकार्जुन लिंगापासून जन्म. | काशी क्षेत्रांत विश्वेश्वर लिंगापासून जन्म. |
| त्यांचीं सिंहासनाधिपत्यस्थानें. | रंभापुरी बाळीहळ्ळी | उज्जयनीपुरी | हिमवत्केदार. | श्रीशैल क्षेत्र | काशी |
| त्यांचीं गोत्रें. | वीर | नंदि | भृंगि | वृषभ | स्कन्द |
| त्यांचें सूत्र. | पड्विडि | वृष्टि | लंबन | मुक्तागुच्छ | पंचवर्ण |
| त्यांचे प्रवर. | एकाक्षर | द्व्यक्षर | त्र्यक्षर | चतुरक्षर | पंचाक्षर |
| त्यांच्या शाखा. | ऋग्वेद | यजुर्वेद | सामवेद | अथर्वणवेद | अजपवेद |
| त्यांच्या कलशांचे धातु. | हिरवे | तांबें | लोखंड | रुपें | सोनें |
| त्यांचें तत्व. | पृथ्वी | अप् | तेज | वायु | आकाश |
| त्यांचे बीजमंत्र. [ बीजाक्षर ] | नकार | मकार | शिकार | वाकार | यकार |

| त्यांचीं उपसूत्रें. | षड्विडि महासूत्राचीं उपसूत्रें | वृष्टि महासूत्राचीं उपसूत्रें | लंबन महासूत्राचीं उपसूत्रें | मुक्तागुच्छ महासूत्राचीं उपसूत्रें | पंचवर्ण महासूत्राचीं उपसूत्रें |
|---|---|---|---|---|---|
| १ | पुराण | लोहकंथा | त्रिपुटी | गोणीकंथा | पाशुपत्य |
| २ | पच्छकंथा | स्वर्णकंथा | रज्जु | दंती | कंबल |
| ३ | षडंग | शृंगी | कंथा | जठर | वृषभ |
| ४ | सुरगि | मसणी | भस्मी | त्रिगुण | दशवक्त्र |
| ५ | महिषी | कुठार | शिखरी | केशकंथा | जरत्कंथा |
| ६ | दिगंबर | भैत्री | रौप्यक | ललाट | पंचमुख |
| ७ | वेणी | कठार | चंद्रकुंड | व्याघ्रकंथा | गुहाग्र |
| ८ | भित्ति | चामरी | मृत्कंथा | लोचन | गोचर |
| ९ | मोरट | कवाट | काष्ठक | भगिनी | गगन |
| १० | नाटी | कुक्षकंथा | पवन | जालकंथा | मुसली |
| ११ | शौरी | ज्वलत्कंथा | रामगिरि | नटन | लगुड |
| १२ | मुसडी | सिंही | खड्गी | बडदि | शिथिली |



श्रीजगद्गुरुपञ्चाचार्येभ्यो नमः



# सुप्रबोधागमे पञ्चमोत्पत्तिः ।

ममेशानमुखोत्पन्नः पंचवक्त्रगणेश्वरः । तन्मुखेभ्यः पंच पुत्राः समुद्भूताः शुचिव्रताः ॥१॥

## पार्वत्युवाच ।

कस्मात्कस्मान्मुखाद्देव को वा को वा ह्यजायत । तस्य तस्य पृथङ् नाम तत्तत्सूत्रं पृथक् पृथक् ॥२॥ सर्वेषामेव गोत्राणि शाखाश्च प्रवरास्तथा । एतद्विस्तार्य भो देव वद मे करुणाकर ॥३॥

---

[१] ईश्वर पार्वतीप्रत सांगतात, 'हे पार्वति, माझ्या ईशान मुखापासून पंचवक्त्र (पांचमुखी) गणेश्वर उत्पन्न झाला. शुचिव्रत (शुद्ध आचरण असलेले) असें पांच पुत्र त्यांच्या पांच मुखांपासून उत्पन्न झाले.' [२] 'पार्वती विचारती झाली कीं, कोणकोणत्या मुखापासून कोणकोण उत्पन्न झाले? त्यांतील प्रत्येकाचें नांव काय? व त्यांचीं वेगवेगळीं सूत्रें कोणतीं? हें सांगा. [३] तसेंच 'हे करुणाकर देवेश' त्या सर्वांचीं गोत्रें, शाखा व प्रवर हीं विस्तारें करून सांगा.'

## ईश्वर उवाच ।

ममोर्ध्वमुखसंजातः पंचवक्त्रगणेश्वरः । अतिवर्णाश्रमोपेतो वीरशैवमताधिकः ॥४॥ तस्य वक्त्रेषु संभूताः पंचमाः पंचसंज्ञिकाः । विस्तार्यते मया देवि तेषां गोत्रादिकं पृथक् ॥५॥ पंचास्यपंचवदनैर्यथा जातास्तथाधिकाः । पंचमाः सर्ववर्णेभ्यो मद्भक्ता मत्प्रिया वराः ॥६। अतिवर्णाश्रमाचाराः शिवलिंगार्चनापराः । ते वै साक्षान्महादेवि मोदंते ह्यागमेषु च ॥७॥ पंचवक्त्रगणेशाच्च समुत्पन्नाश्च पंचमाः । मखारिश्चैव कालारिः पुरारिश्च स्मरारिकः ॥८॥ वेदारिः पंचमश्चेति पंचनामसमन्विताः । तेषां मध्ये प्रिये यस्य चोपदेष्टा च यो गुरुः ॥९। गुरोर्गोत्रं च तद्गोत्रं ज्ञेयं

---

[४] 'ईश्वर सांगतात, माझ्या ऊर्ध्व मुखापासून पंचवक्त्र गणेश्वर उत्पन्न झाला. तो अतिवर्णाश्रमी ( वर्णोत्तमाश्रमी ) असून वीरशैव मतामध्यें श्रेष्ठ आहे. [५] त्याच्या पांच मुखांपासून पांच पंचम उत्पन्न झाले. त्यांचीं गोत्रें वगैरे सर्व विस्तारें करून मी तुला सांगतों. [६] पंचवक्त्र ( पांचमुखी ) गणेश्वराच्या पांच मुखांपासून उत्पन्न झाल्यामुळें तेही श्रेष्ठच होत. पंचम हे माझे प्रिय भक्त असून सर्व वर्णांमध्यें ते श्रेष्ठ आहेत. [७] त्यांचा आचार अतिवर्णाश्रमाचा (उत्तमवर्णाश्रमाचा) असून ते शिवलिंग पूजेमध्यें सदा निमग्न असतात. हे महादेवि, त्यांनाच केवळ आगमांमध्यें खरोखर आनंद होतो. [८] पंचवक्त्र गणेशापासून पंचम उत्पन्न झाले. मखारि, कालारि, पुरारि, स्मरारि, [९] व वेदारि हींच त्या पांच पंचमांचीं नांवें. या पांचापैकीं

सर्वप्रकारतः । स्वगोत्रैः सह संबंधो न कार्यश्च कदा चन ॥१०॥ प्रमादाद्यः प्रकुर्वीत संबंधं स तु दोषभाक् । एतस्मात्पंचमानां वै तेषां गोत्रादिकं पृथक् ॥११॥ तेषां प्रवरशाखे च सूत्रं वर्णो मनुः पृथक् । गुरवश्चाश्रमास्तेषां निर्दिष्टाश्च पृथक् पृथक् ॥१२॥ मखारिः पंचमाख्यस्य वीरगोत्रं प्रगीयते । तच्छाखा रेणुकाभिख्या प्रवरैकाक्षरो मतः ॥१३॥ सूत्रं पडिविडी चेति मूलवर्णं नकारकम् । कलशश्च हरिद्वर्णश्चाराध्यो रेवणो गुरुः ॥१४॥ तस्य मंत्रः प्रसादाख्यो दशवर्णसमन्वितः । ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं नमः शिवाय च । इति मंत्रोपदेशश्च व्यकारि गुरुणा शिवे ॥ १५ ॥

---

ज्यांचा उपदेशक असेल तोच त्याचा गुरु समजावा. [१०] गुरूचें जें गोत्र तेंच सर्व प्रकारें त्याचें गोत्र असें समजावें. स्वगोत्रीयांबरोबर (एक गोत्री) लग्नादि संबंध केव्हांही करूं नयेत. (११) जर चुकून कोणी असा स्वगोत्री संबंध करील तर तो निश्चयें करून दोषी ठरतो. याकरितां त्या पंचमाचीं गोत्रें निरनिराळीं असून [१२] त्यांचे प्रवर, शाखा, सूत्र, वर्ण व मंत्र हींही निरनिराळींच आहेत. तसेंच त्यांचे गुरु व आश्रम देखील वेगवेगळेच सांगितलेले आहेत. [१३] मखारि नांवाच्या पंचमाचें गोत्र वीरगोत्र असून त्याची शाखा रेणुकशाखा व एकाक्षर हा प्रवर सांगितलेला आहे. [१४] त्याचें सूत्र पडविडी असून नकार मूलवर्ण आहे. कलश हरिद्राभ (पिवळ्या वर्णाचा असून) त्या मखारि पंचमाचा गुरु रेवणाराध्य समजावा. [१५] ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं नमः शिवाय असा दहा वर्णांचा प्रसाद नांवाचा त्याचा

सोऽन्त्याश्रमो गृहस्थः स्यादिष्टलिंगेन संयुतः । एतैश्च लक्षणैर्युक्तो मखारिः पंचमस्तथा ॥१६॥ तत्सूत्रे च समुत्पन्ना द्वादश ह्युपपंचमाः । पंचवक्त्रगणेशस्य सद्योजातमुखाच्छिवे ॥१७॥ पंचमश्च समुद्भूतो मखारिर्गणनायकः । तस्य गर्भे च संभूता द्वादशैवोपपंचमाः ॥१८॥ तस्य तस्य पृथङ्नाम प्रवदामि वरानने । शतांगः प्रमुखश्चैव शंकरो वृषभाह्वयः ॥१९॥ सहस्राक्षः सधर्माख्यो विषमो मोचकाह्वयः । वृकभंदी कुंजरारिः शेषः शिखिहरित्प्रिये ॥२०॥ इत्येतैर्नामभिर्युक्ता द्वादशैवोपपंचमाः । सर्वे पंचमनामानो मखारिगणसंभवाः ॥२१॥ गुरोर्गोत्रं च तेषां वै ज्ञातव्यं हि वरानने । हित्वा स्वगोत्रमन्यस्मिन् कर्तव्यं पाणिपी-

---

मंत्र असून, पार्वति, त्या मंत्राचा उपदेश गुरुमुखानें व्हावा लागतो. [१६] श्रेष्ठ आश्रमांतील गृहस्थानें इष्टलिंग धारण करावें, व अशा वर सांगितलेल्या लक्षणांनीं जो युक्त आहे, तो मखारि पंचम समजावा. [१७] त्या मखारि पंचमाच्या सूत्रामध्यें बारा उपपंचम उत्पन्न झाले; पंचवक्त्र गणेशाच्या सद्योजातमुखापासून, [१८] गणनायक मखारि पंचम उत्पन्न झाला. त्या मखारि पंचमापासून बारा उपपंचम उत्पन्न झाले. [१९] हे वरानने, त्या प्रत्येकाचें नांव मी तुला सांगतो. शतांग, प्रमुख, शंकर, वृषभ, [२०] सहस्राक्ष, सधर्म, विषम, मोचक, वृकभंदी, कुंजरारि, शेष व शिखिहरित् अशा [२१] या नांवाचे बारा उपपंचम असून ते सर्व पंचम मखारि पंचमापासून उत्पन्न झालेले आहेत. [२२] हे वरानने, जें गुरूचें गोत्र असेल तेंच त्याचेंही गोत्र समजावें.

डनम् ॥ २२ ॥ प्रमादाद्यः प्रकुर्वीत संबंधं स तु दोषभाक्। कालारिपंचमाख्यस्य नंदिगोत्रं प्रकीर्तितम् ॥२३॥ तच्छाखा दारुको नाम प्रवरो त्र्यक्षरो मतः। तत्सूत्रं वृष्टिसन्नाम मूलवर्णं मकारकम् ॥ २४ ॥ कलशस्ताम्रविकृतिराराध्यो मरुलार्यकः। मायापंचाक्षरो मंत्रो नववर्णसमन्वितः ॥२५॥ ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं नमः शिवाय। इति मंत्रोपदेशश्च त्वकारि गुरुणा प्रिये ॥२६॥ सोऽतिवर्णी गृहस्थः स्यादिष्टलिंगार्चने रतः। एतैश्च लक्षणैर्युक्तो कालारिः पंचमस्तथा ॥२७॥ तत्सूत्रे च समुत्पन्ना द्वादश ह्युप-पंचमाः। वामदेवमुखाद्देवि कालारिर्गणपोऽभवत् ॥२८॥ तस्य गर्भे समुत्पन्ना द्वादश ह्युपपंचमाः। तस्य तस्य पृथङ्नाम वदामि

---

स्वगोत्र सोडून इतर गोत्राशीं लग्नसंबंध करावा; [२३] चुकून स्वगोत्रीं लग्नसंबंध जो करील तो दोषी ठरतो. कालारि नांवाच्या पंचमाचें नंदिगोत्र सांगितलेलें आहे. [२४] दारुक नांवाची त्याची शाखा असून त्र्यक्षर हा त्याचा प्रवर होय. त्याचें वृष्टिसूत्र असून मकार मूलवर्ण आहे. [२५] त्याचा कलश ताम्र वर्णाचा (तांबूस रंगाचा) असून मरुळाराध्य हा त्याचा गुरु होय. मायापंचाक्षर हा त्याचा मंत्र असून तो नऊ वर्णांचा [२६] म्हणजे, ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं नमः शिवाय असा आहे. व या मंत्राचा उपदेश, पार्वति, गुरुमुखानें व्हावा लागतो. [२७] श्रेष्ठवर्णाश्रमी गृहस्थ इष्टलिंगाच्या पूजेमध्यें सदा निमग्न असतो, व अशा वर सांगितलेल्या लक्षणांनीं जो युक्त असेल तो, कालारि पंचम जाणावा. [२८] त्या कालारि पंचमाच्या सूत्रामध्यें

कमलेक्षणे ॥ २९ ॥ केशराक्षो मृगारिश्च नाकेशश्च वृषाह्वयः । शिलांगश्च शृंगशीर्षो नीलांबरकुहासनौ ॥ ३० ॥ शतबाहुर्बहुजिह्वो नागदंतः षणात्रपुः । इत्येतैर्नामभिर्युक्ता द्वादश ह्युपपंचमा ॥ ३१ ॥ पंचमाः सर्व एवैते कालारिगणसंभवाः । गुरोर्गोत्रं हि तेषां वै ज्ञातव्यं च महात्मभिः ॥ ३२ ॥ मुक्त्वा स्वगोत्रमन्यस्मिन्कुर्यादुद्वाहमद्रिजे । तस्मिन्कदाचित्संबंधो न कार्यः कमलानने ॥ ३३ ॥ प्रमादाद्यः प्रकुर्वीत संबंधं स तु दोषभाक् । पुरारेः पंचमाख्यस्य भृंगिगोत्रं तथैव च ॥ ३४ ॥ तच्छाखा शंकुकर्णाख्या प्रवरस्त्र्यक्षरो मतः । तत्सूत्रं लंबनाख्यं च मूळवर्णे शिकारकम् ॥ ३५ ॥

---

बारा उपपंचम उत्पन्न झाले, पंचवक्त्र गणेशाचा वामदेव मुखापासून, पार्वति, कालारि गणनायक उत्पन्न झाला. [२९] त्या कालारि पंचमाच्या पोटीं बारा उपपंचम उत्पन्न झाले. हे कमलनेत्रे पार्वति, त्या त्या प्रत्येकाचें नांव मी तुला सांगतों. [३०] केशराक्ष, मृगारि, नाकेश, वृष, शिलांग, शृंगशीर्ष, नीलांबर, कुहासन, [३१] शतबाहु, बहुजिह्व, नागदंत, व षणावपु या नांवाचे ते बारा उपपंचम असून [३२] ते सर्व पंचम कालारिपंचमापासून उत्पन्न झालेले आहेत. गुरूचें जें गोत्र तेंच त्यांचेंही गोत्र असें समजावें. [३३] स्वगोत्र सोडून, पार्वति, इतर गोत्रांमध्यें लग्नव्यवहार करावा. हे कमलानने, स्वगोत्रामध्यें लग्नसंबंध केव्हांही करूं नये. [३४] जर चुकून कोणी स्वगोत्रांत लग्नसंबंध करील तर तो दोषी ठरतो. पुरारिपंचमाचें भृंगगोत्र समजावें. [३५] शंकुकर्ण नांवाची त्याची शाखा असून त्र्यक्षर हा

कृष्णवर्णस्तु कलशो रामाचार्यो महागुरुः । सूक्ष्मपंचाक्षरो मंत्रश्चाष्टाक्षरसमन्वितः ॥३६॥ ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं नमः शिवाय । इति मंत्रोपदेशो ह्यभवत्तस्य महामतेः ॥३७॥ सोऽतिवर्णी गृहस्थः स्यादिष्टलिंगेन संयुतः । एतैश्च लक्षणैर्युक्तः पुरारिः पंचमस्तथा ॥३८॥ तत्सूत्रे च समुत्पन्ना द्वादश ह्युपपंचमाः । अघोराख्यमुखोद्भूतः पुरारिर्गणनायकः ॥३९॥ तस्य गर्भे समुत्पन्ना ऋतुद्विगुणपंचमाः । तस्य तस्य पृथङ्नाम वदामि शृणु भामिनि ॥४०॥ अग्निमुक्तश्च हारीतो जाबालो निर्जरस्तथा । निशितश्च शशांकश्च ललाटाक्षः कराक्षकः ॥४१॥ पादाख्यो

---

त्याचा प्रवर होय. मुक्तगुच्छ हें त्याचें सूत्र असून शिकार मूलवर्ण आहे. [३६] कलश कृष्णवर्ण असून रामाचार्य हा त्याचा गुरु होय. सूक्ष्म पंचाक्षर हा त्याचा मंत्र असून तो आठ अक्षरांचा [३७] म्हणजे, ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं नमः शिवाय असा आहे. याप्रमाणें त्या महामतीचा ( कालारिगणनायकाचा ) मंत्रोपदेश समजावा [३८] श्रेष्ठ वर्णाश्रमी गृहस्थानें इष्टलिंग धारण करावें. व, या वर सांगितलेल्या लक्षणांनीं जो युक्त असेल, तो पुरारिपंचम समजावा. [३९] त्या पुरारिपंचमाच्या सूत्रामध्यें बारा उपपंचम उत्पन्न झाले; व पंचवक्त्र गणेशाच्या अघोर नांवाच्या मुखापासून पुरारिगणनायक उत्पन्न झालेला आहे. [४०] त्या पुरारिगणनायकाच्या पोटी बारा उपपंचम उत्पन्न झाले, हे भामिनि, त्या प्रत्येकाचें नांव तुला सांगतों तें ऐक [४१] अग्निमुक्त, हारीत, जाबाल, निर्जर, निशित, शशांक, ललाटाक्ष,

विकटांगश्च शिलादश्च हरिन्मुखः । इत्येतैर्नामभिर्युक्ता उपपंचमसंज्ञकाः ॥४२॥ सर्वे पंचमनामानः पुरारिगणसंभवाः । गुरोर्गोत्रं च तेषां वै ज्ञातव्यं च मनीषिभिः ॥४३॥ त्यक्त्वा स्वगोत्रमन्यस्मिन्कुर्यादुद्वाहमद्रिजे। स्वस्मिन्कदाचित्संबंधं न कुर्याद्धर्मशास्त्रवित् ॥४४॥ प्रमादाद्यः प्रकुर्वीत संबंधं स तु दोषभाक् । स्मरारिपंचमाख्यस्य वृषगोत्रं प्रकीर्त्यते ॥४५॥ तच्छाखा धेनुकर्णाख्या प्रवरश्चतुरक्षरः । मुक्तागुच्छश्च तत्सूत्रं मूलवर्णं वकारकम् ॥४६॥ श्वेतवर्णस्तत्कलशश्चाराध्यः पंडितस्तथा । स्थूलपंचाक्षरो मंत्रो सप्तवर्णसमन्वितः ॥४७॥ ॐ ऱ्हां ऱ्हीं नमः शिवाय सर्वोत्कृष्ट-

---

कराक्ष, [४२] पादास्य, विकटांग, शिलाद, व हरिन्मुख या नांवाचे ते बारा उपपंचम होत. [४३] व ते सर्व पंचम पुरारिगणनायकापासून उत्पन्न झाले. जें गुरूचें गोत्र तेंच त्या सर्वांचें गोत्र असें समजावें. [४४] स्वगोत्र सोडून, पार्वति, इतर गोत्राबरोबर लग्नव्यवहार करावा. स्वगोत्रामध्यें लग्नसंबंध शास्त्र जाणणाऱ्यानें केव्हांही करूं नये. [४५] जर चुकून कोणी स्वगोत्रांत लग्न संबंध करील, तर तो दोषी ठरतो. स्मरारिनांवाच्या पंचमाचें भृंगी गोत्र सांगितलेलें आहे. [४६] धेनुकर्ण नांवाची त्याची शाखा असून चतुरक्षर हा त्याचा प्रवर आहे. त्याचें सूत्र मुक्तागुच्छ नांवाचें असून मूलवर्ण वाकार आहे. [४७] त्याचा कलश श्वेतवर्ण ( पांढऱ्या रंगाचा ) असून त्याचा गुरु पंडिताराध्य आहे. स्थूलपंचाक्षर हा त्याचा मंत्र असून तो सात वर्णांचा [४८] म्हणजे, ॐ ऱ्हां ऱ्हीं नमः शिवाय असा आहे, व हा

मिदं स्मृतम् । एतादृशमहामंत्रस्योपदेशेन राजितः ॥४८॥ सोऽन्त्याश्रमी गृहस्थः स्यादिष्टलिंगार्चने रतः । एतैश्च लक्षणैर्युक्तः स्मरारिः पंचमस्तथा ॥४९ तत्सूत्रे च समुत्पन्ना द्वादश ह्युपपंचमाः । तत्पुरुषाख्यवदनात्स्मरारिर्गणपोऽभवत् ॥५०॥ तस्य गर्भे समुद्भूता ऋतुद्विगुणपंचमाः । तस्य तस्य पृथङ्नाम प्रवदामि वरानने ॥५१॥ सहस्रशीर्षः पीतांगो नगमालो निराशनः । यमद्युतिश्च सप्तांगो लतांगो मृत्युनाशनः ॥५२॥ अतनुघोंटवक्त्रश्च नीरोगश्च भवाह्वयः । एतैर्नामभिर्युक्ताश्च विश्रुता उपपंचमाः ॥५३॥ एतेषां पंचमानां च स्मरारेश्च समुद्भवः । गुरोर्गोत्रं च तेषां वै गोत्रं ज्ञेयं वरानने ॥५४॥ त्यक्त्वा स्वगोत्रमन्यस्मिन्कुर्या-

---

सर्वांमध्यें उत्कृष्ट समजलेला आहे. अशा प्रकारच्या महामंत्राचा उपदेश घेऊन [४९] श्रेष्ठवर्णाश्रमी गृहस्थानें इष्टलिंगाच्या पूजेमध्यें सदा रत असावें. या वर सांगितलेल्या लक्षणांनीं जो युक्त आहे, तो स्मरारिपंचम समजावा. [५०] त्या स्मरारिपंचमाच्या सूत्रामध्यें बारा उपपंचम उत्पन्न झाले. पंचवक्त्रगणेशाच्या तत्पुरुष नांवाच्या मुखापासून स्मरारिगणनायक उत्पन्न झाला. [५१] त्या स्मरारिगणनायकाच्या पोटीं बारा उपपंचम उत्पन्न झाले. हे वरानने, त्या प्रत्येकाचें वेगळें वेगळें नांव मी तुला सांगतों. [५२] सहस्रशीर्ष, पीतांग, नगमाल, निराशन, यमद्युति, सप्तांग, ललितांग, मृत्युनाशन, [५३] अतनु, घोटवक्त्र, नीरोग, व भव या नांवाचे ते बारा उपपंचम असून [५४] गुरूचें ते सर्व पंचम स्मरारिगणनायकापासून उत्पन्न झाले. हे वरानने, जें

दुद्वाहमाद्रिजे । स्वस्मिन्कदाचित्संबंधो न कार्यश्च मनीषिभिः ॥५५॥ प्रमादाद्यः प्रकुर्वीत संबंधं स तु दोषभाक् । वेदारि-पंचमाख्यस्य स्कंदगोत्रं हि गीयते ॥५६॥ तच्छाखा विश्व-कर्णाख्या प्रवरः पंचकाक्षरः । तत्सूत्रं पंचवर्णं च मूलवर्णं यकारकम् ॥५७॥ सौवर्णश्चापि कलशो विश्वाराध्यो गुरुः स्मृतः । षडक्षरो महामंत्रो मूलमंत्रः स एव हि ॥५८॥ ॐ नमः शिवाय मनुः सर्वमंत्रेषु चोत्तमः । एतादृशमहामंत्रस्योपदेशेन राजितः ॥५९॥ सोऽत्याश्रमी गृहस्थः स्यादिष्टलिंगेन संयुतः । एतैश्च लक्षणैर्युक्तो वेदारिः पंचमस्तथा ॥६०॥ तत्सूत्रे च समुत्पन्ना द्वादश ह्युपपंचमाः । ईशानाख्यमुखाद्देवि वेदारिः

---

गोत्र तेंच त्या सर्वांचें गोत्र समजावें. [५५] स्वगोत्र सोडून, पार्वति, इतर गोत्रांबरोबर लग्नव्यवहार करावा स्वगोत्रांमध्यें लग्नसंबंध जाणत्यानें केव्हांही करूंनये. [५६] जर चुकून कोणी स्वगोत्रांत लग्नसंबंध करील तर तो दोषी ठरतो. वेदारि नांवाच्या पंचमाचें स्कंद गोत्र सांगितलेलें आहे [५७] विश्व-कर्ण नांवाची त्याची शाखा असून पंचाक्षर हा त्याचा प्रवर आहे, पंचवर्ण हें त्याचें सूत्र असून मूलवर्ण यकार आहे. [५८] कल्याणाख्य त्याचा कलश व विश्वाराध्य हा त्याचा गुरु समजावा. महामंत्र षडक्षर हा त्याचा मंत्र असून तोच मूलमंत्र आहे. [५९] तो षडक्षरमंत्र ह्मणजे 'ॐ नमः शिवाय' हा असून सर्व मंत्रांमध्यें उत्तम असा आहे. अशा प्रकारच्या महामंत्राचा उपदेश घेऊन, [६०] श्रेष्ठवर्णाश्रमी गृहस्थानें सदा इष्टलिंग धारण करावें. या वर सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त जो

समजायत ॥६१॥ तस्य गर्भे समुद्भूता द्वादशैवोपपंचमाः। तस्य तस्य पृथङ्नाम वदामि शृणु मत्प्रिये ॥६२॥ पश्चाद्दग्विश्वपुष्टश्च गोमुखो गिरिवक्त्रकः। सुवर्णनखरोऽजांघ्रिर्दशानन-त्रिषाननौ ॥६३॥ उग्रदेहः शतपदः सहस्रस्कंध एव च। त्रिमुखस्कंधविख्यातो द्वादश ह्युपपंचमाः ॥६४॥ एते वै पंचमाः सर्वे वेदारेर्गर्भसंभवाः। गुरोर्गोत्रं च तेषां वै गोत्रं ज्ञेयं वरानने ॥६५॥ हित्वा स्वगोत्रमन्यस्मिन्कर्तव्यं पाणिपीडनम्। स्वगोत्रे चैव संबंधो न कार्यः सुमनीषिभिः ॥६६॥ प्रमादाद्यः प्रकुर्वीत संबंधं स तु दोषभाक्। स्वगोत्रकं गुरुं त्यक्त्वा चान्यगोत्रः

---

असेल, तो वेदारिपंचम समजावा. [६१] त्याच्या सूत्रामध्यें बारा उपपंचम उत्पन्न झाले. पंचवक्त्रगणाधीशाच्या ईशान नांवाच्या मुखापासून, पार्वति, वेदारिपंचम उत्पन्न झाला. [६२] त्या वेदारिपंचमाच्या पोटीं बारा उपपंचम उत्पन्न झाले. पार्वति, त्या प्रत्येकाचें वेगळें वेगळें नांव मी तुला सांगतों. तें तूं ऐक. [६३] पश्चाद्दक, विश्वपुष्ट, गोमुख; गिरिवक्त्रक, सुवर्ण नखर, अजांघ्रि, दशानन, विपानन, [६४] उग्रदेह, शतपद, सहस्रस्कंध, व त्रिमुखस्कंध या नांवाचे ते बारा उपपंचम असून [६५] ते सर्व पंचम वेदारिगणनायकापासून उत्पन्न झाले. हे वराननें, जें गुरूचें गोत्र, तेंच त्या सर्वांचें गोत्र असें समजावें [६६] स्वगोत्र सोडून अन्य गोत्राबरोबर लग्न संबंध करावा. स्वगोत्रामध्यें लग्नसंबंध केव्हांही करूं नये. [६७] जर चुकून कोणी स्वगोत्रीं लग्नसंबंध करील तर तो दोषी ठरतो. आपल्या गोत्रांतील गुरूला

गुरोरपि ॥६७॥ यः कुर्वीतोद्वाहविधिं स चांडालो भविष्यति। तस्मात्कारणतो देवि स्वाचार्येण महात्मना ॥६८॥ कार्यं वैवाहिकं कर्म श्लाघ्यं ज्ञेयं महात्मभिः । प्रमादाद्यः प्रकुर्वीत स्वस्वगोत्रे विवाहकम् ॥६९॥ स स्वपुत्रीसमायोगाद्गोत्रसांकर्यकारकः । तत्र पंचविधाः संति गुरूणां कलशाः प्रिये ॥७०॥ सूत्रं वर्णस्तथा शाखा मंत्रप्रवरकावपि । स्वस्वगोत्रानुसारेण सर्वं ज्ञेयं मनीषिभिः ॥७१॥ तेषां संस्थापनविधिं वक्ष्ये शास्त्रविनिश्चितम् । चरंति पंचप्रणवाः स्वस्वगोत्रानुसारतः ॥७२॥ मखारेर्गोत्रजातानां विवाहोऽपि यदा भवेत् । तदा तत्प्रणवं मध्ये नकारं

---

सोडून अन्यगोत्रांतील गुरूकडून [६८] जो लग्नविधि उरकून घेईल तो चांडाळ होतो. त्याकारणामुळें, पार्वति, महात्मा असा जो आपला गुरु असेल त्याकडूनच [६९] विवाहादि कर्में करावींत, हाच मार्ग स्तुत्य असें थोरमनाच्या पुरुषांनीं समजावें. चुकून जो कोणी स्वगोत्रांत लग्नसंबंध करितो. [७०] तो आपल्या गोत्रांतील कन्यकांच्या समायोगानें (समागमें) गोत्राचा संकर (भेसळ) करणारा होतो. पार्वति, लग्नादि कार्यांमध्यें गुरुजनांचे पांच प्रकारचे कलश असतात. [७१] सूत्र, वर्ण, त्याप्रमाणें शाखा, मंत्र व प्रवर हीं सर्व आपआपल्या गोत्रांवरून ज्ञानवंतांनीं निरनिराळीं अशीं जाणावींत. [७२] शास्त्रोक्तरीतीनें त्या पंचकलशांची स्थापना कशी करावी तें आतां सांगतों. आपआपल्या गोत्रानुरोधानें प्रणव पांच प्रकारचे आहेत. [७३] मखारिपंचमाच्या गोत्रांत (वीरगोत्रांत) जन्मलेल्या मनुष्याचा विवाह

स्थापयेद्बुधः ॥७३॥ मकारं पूर्वतः कृत्वा शिकारं दक्षिणे न्यसेत् । वकारं पश्चिमे कुर्याद्यकारं चोत्तरे न्यसेत् ॥७४॥ कालारेर्गोत्रजातानां विवाहोऽपि यदा भवेत् । तदा मकारं मध्ये तु प्रणवं स्थापयेद्बुधः ॥७५॥ शिकारं पूर्वदेशे तु वकारं दक्षिणे न्यसेत् । यकारं पश्चिमे कुर्यान्नकारं चोत्तरे न्यसेत् ॥७६॥ पुरारेर्गोत्रजातानां विवाहोऽपि यदा भवेत् । तदा तत्प्रणवं मध्ये शिकारं विन्यसेद्बुधः ॥७७॥ वकारं पूर्वतः कृत्वा यकारं दक्षिणे न्यसेत् । नकारं पश्चिमे कृत्वा मकारं चोत्तरे न्यसेत् ॥७८॥

---

व्हावयाचा असल्यास ज्ञानवंतानें त्याच्या ( मखारिपंचमाच्या ) नकार प्रणवाची स्थापना मध्यठिकाणीं करावी. [७४] मकार पूर्वेकडे करून शिकाराचा न्यास दक्षिणेकडे करावा, वकार पश्चिमेकडे करून यकाराची स्थापना उत्तर दिशेकडे करावी. [७५] कालारिपंचमाच्या गोत्रांत ( नंदिगोत्रांत ) जन्मलेल्या मनुष्याचा विवाह व्हावयाचा असल्यास, ज्ञानवंतानें त्याच्या ( कालारिपंचमाच्या ) मकार प्रणवाची स्थापना मध्यठिकाणीं करावी. [७६] शिकार पूर्व दिशेकडे करून वकाराचा न्यास दक्षिणेकडे करावा; यकार पश्चिमेकडे करून नकाराची स्थापना उत्तर दिशेकडे करावी. [७७] पुरारिपंचमाच्या गोत्रांत ( वृषगोत्रांत ) जन्मलेल्या मनुष्याचा विवाह व्हावयाचा असल्यास, ज्ञानवंतानें त्याच्या ( पुरारिपंचमाच्या ) शिकार प्रणवाची स्थापना मध्यठिकाणीं करावी [७८] वकार पूर्वदिशेकडे करून यकाराचा न्यास दक्षिणेकडे करावा. नकार पश्चिमेकडे करून मकाराची स्थापना

स्मरारेर्गोत्रजातानां विवाहोऽपि यदा भवेत् । तदा तत्प्रणवं मध्ये वकारं विन्यसेद्बुधः ॥७९॥ यकारं पूर्वतः कृत्वा नकारं दक्षिणे न्यसेत् । मकारं पश्चिमे कृत्वा शिकारं चोत्तरे न्यसेत् ॥८०॥ वेदारेर्गोत्रजातानां विवाहोऽपि यदा भवेत् । तदा तत्प्रणवं मध्ये यकारं स्थापयेद्बुधः ॥८१। नकारं पूर्वतः कृत्वा मकारं दक्षिणे न्यसेत् । शिकारं पश्चिमे कृत्वा वकारं चोत्तरे न्यसेत् ॥८२॥ मखारेश्च नकारोऽयं कालारेश्च मकारकः । पुरारेश्च शिकारोऽयं स्मरारेश्च वकारकः ॥८३॥ यकारश्चैव वेदारेः प्रणवाः परिकीर्तिताः ।

---

उत्तरदिशेकडे करावी. [७९] स्मरारि पंचमाच्या गोत्रांत (भृंगीगोत्रांत) जन्मलेल्या मनुष्याचा विवाह व्हावयाचा असल्यास, ज्ञानवंतानें त्याच्या (स्मरारि पंचमाच्या) वकारप्रणवाची स्थापना मध्यठिकाणीं करावी. [८०] यकार पूर्वदिशेकडे करून नकाराचा न्यास दक्षिणेकडे करावा. मकार पश्चिमेकडे करून शिकाराची स्थापना उत्तर दिशेकडे करावी. [८१] वेदारि पंचमाच्या गोत्रांत (स्कंदगोत्रांत) जन्मलेल्या मनुष्याचा विवाह व्हावयाचा असल्यास, ज्ञानवंतानें त्याच्या (वेदारि-पंचमाच्या) यकारप्रणवाची स्थापना मध्यठिकाणीं करावी. [८२] नकार पूर्वदिशेकडे करून मकाराचा न्यास दक्षिणेकडे करावा. शिकार पश्चिमेकडे करून वकाराची स्थापना उत्तरदिशेकडे करावी. [८३] मखारि पंचमाचा नकार, कालारि पंचमाचा मकार, पुरारि पंच-माचा शिकार, स्मरारि पंचमाचा वकार, [८४] व वेदारि पंचमाचा यकार, असे हे प्रणव सांगितलेले आहेत. ज्या दिशेकडे जो प्रणव

यस्यां दिशि यः प्रणवः सा दिक् तस्य विनिर्दिशेत् ॥४॥ दिक् प्रधानं न चैतेषां प्रणवेनैव निर्णयः । एवं शास्त्रोक्तविधिना पंचकान्कलशानपि ॥८५॥ संस्थाप्य फलनैवेद्यैर्दशधा बंधितैस्तथा । सदक्षिणैः सतांबूलैः परिपूज्य यथाविधि ॥८६॥ पार्वत्युवाच । पंचैव कलशास्तत्र स्थापितव्या हि शंकर । किमर्थं दशधा तेषां नैवेद्यादि विनिक्षिपेत् ॥८७॥ ईश्वर उवाच । पंचाचार्याः पंचविधा वृत्त्याचार्याश्च पंचधा । एवं दशविधानां तु भागश्च परिकल्पितः ॥८८॥ तस्माद्दशविधं तत्र फलनैवेद्यकं न्यसेत् । पंच पूर्णानि निक्षिप्य तदर्धं पंचधा क्षिपेत् ॥८९॥

---

असेल ती दिशा त्याची (तो प्रणव ज्याचा असेल त्या पंचमाची) असें समजावें.( ८५ ) दिशांचे यांत कांहीं प्राधान्य नसून केवळ प्रणवांच्या योगानेंच निर्णय करावयाचा असतो. याप्रमाणें शास्त्रोक्त विधीनें पांचही कलशांची ( ८६ ) स्थापना करावी, व फल नैवेद्याचे दहा विभाग करून बांधावेत; दक्षिणा व तांबूल यांनीं युक्त यथाविधि पूजा करावी. ( ८७ ) पार्वती विचारती झाली कीं, हे भगवन् शंकरा, पांचच कलशांची स्थापना करावी असें असून, मग नैवेद्यादिकांचे असे दहा विभाग करण्याचें कारण काय ! ( ८८ ) ईश्वर सांगतात, जसें पंचाचार्य पांच प्रकारचे तसेच वृत्त्याचार्यही पांच प्रकारचे असल्यामुळें, दहांकरितां नैवेद्याला दहा प्रकारच्या फलादिकांच्या दहा भागांची योजना करावी लागते. [८९] वर जे दहा भाग सांगितलें त्यांत पूर्ण फलादिकांचेच पांच भाग व अर्ध्या फलादिकांचे पांच भाग असे दहा

पूर्णभागं महाचार्या आहरेयुर्यथाक्रमम् । उपसूत्रैः समायुक्ता-श्चैवमेव विनिर्णयः ॥९०॥ तदर्धं चैव गृण्हीयुर्वृत्त्याचार्यास्ततः परम् । एकस्य भागमेकश्च गृहीतुं नैव चार्हति ॥९१॥ बलादपि च गृण्हीयात्समानस्कंधता भवेत् । तेन दोषफलं भुक्त्वा नरकानेव विंदति ॥९२॥ वृत्त्याचार्यपदार्थं तु महाचार्यो यदा हरेत् । तदा तस्यैव नगजे न्यूनता भवति ध्रुवम् ।.९३॥ एवं शास्त्रोक्तविधिना पंचकान्कलशानपि । प्राणप्रतिष्ठां कृत्वा तान्ब्रह्ममंत्रैर्न्यसेद्बुधः॥९४॥ इति वीरशैवब्राह्मणपंचमहाचार्यपंचमोत्पत्तिप्रकरणं समाप्तम् ।

---

भाग करावेत. [९०] पूर्णभाग असतील ते महाचार्यांनीं यथाक्रम ( आपआपल्या प्रणवाच्याक्रमानें ) घ्यावेत. त्यांमध्यें उपसूत्रांचे ( प्रत्येक सूत्रांमध्यें बारा बारा उपसूत्रें असल्यामुळें ) कोणी असल्यास त्यांच्या भागासंबंधीं निर्णय याप्रमाणेंच यथाक्रम करावा. [९१] नंतर, अर्धे अर्धे जे भाग असतील ते वृत्त्याचार्यांनीं घ्यावेत. एकाचा भाग दुसऱ्यानें केव्हांही घेऊं नये. [ ९२ ] बलात्कारानें दुसऱ्याचा भाग घेतल्यास समानस्कंधता ( वरिष्ठांशीं बरोबरी केल्यासारखें ) होते, व या प्रकारें अन्यायानें दुसऱ्याच्या फलाचा उपभोग घेतल्यानें नरकाचीच प्राप्ति होते. [९३] जेव्हां महाचार्य हा वृत्त्याचार्याचा भाग उचलील तेव्हां भाग त्यास देऊं, ह्मणजे अर्थांतच त्याला कमी मिळुन त्याचेंच नुकसान होतें. [९४] याप्रमाणें ब्रम्हमंत्रानें प्राणप्रतिष्ठा केल्यानंतर शास्त्रोक्तविधीनें पांचही कलशांची स्थापना करावी.

वीरशैवब्राह्मणपंचाचार्यांचें व पंचमोत्पत्तीचें प्रकरण संपलें.

॥ श्रीशिवाय नमः ॥

## सुप्रबोधागमांत सांगितल्याप्रमाणें पंचमाची व उपपंचमाची उत्पत्ति, गोत्र, सूत्र, शाखा वगैरेंचा सारांश.

| पंचवक्त्र गणाधीश्वराचीं पांच मुखें. | सद्योजात. | वामदेव | अघोर | तत्पुरुष | ईशान |
|---|---|---|---|---|---|
| पांच मुखांपासून पांचजण मुख्य पंचम उत्पन्न झाले त्यांचीं नांवें. | मखारि | कालारि | पुरारि | स्मरारि | वेदारि |
| पंचमांचें गुरु. | रेवणाराध्य. | मरुळाराध्य. | एकोरामाराध्य. | पंडिताराध्य | विश्वाराध्य |
| पंचमांचीं गोत्रें. | वीर | नंदि | भृंगि | वृषभ | स्कन्द |
| पंचमांचीं सूत्रें. | पड्विडि | वृष्टि | लंबन | मुक्तागुच्छ | पंचवर्ण |
| पंचमांचे प्रवर. | एकाक्षर | द्व्यक्षर | त्र्यक्षर | चतुरक्षर | पंचाक्षर |
| पंचमांच्या शाखा. | रेणुक | दारुक | घंटाकर्ण | धेनुकर्ण | विश्वकर्ण |
| पंचमांच्या कलशांचे धातु. | हिरवे | तांबें | लोखंड | रुपें | सोनें |
| पंचमांचीं तत्वें. | पृथ्वी | अप् | तेज | वायु | आकाश |
| पंचमांचे बीजमंत्र. [ बीजाक्षर ] | नकार | मकार | शिकार | वाकार | यकार |

| पंचमांचे उपपंचम | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | शतांग | केशराक्ष | अग्नियुक्त | सहस्रशीर्ष | पश्चाद्दक् |
| २ | प्रमुख | मृगारि | हरीत | पीतांग | विश्वपुष्ट |
| ३ | शर्कर | नाकेश | जाबाल | नगमाल | गोमुख |
| ४ | वृषभ | वृषण | निर्जर | निराशन | गिरिवक्त्र |
| ५ | सहस्राक्ष | शिलांग | निशित | यमद्युति | सुवर्णनखर |
| ६ | धर्म | श्रृंगशीर्ष | शशांक | सप्तांग | अघ्रांघ्रि |
| ७ | विषम | नीलांबर | ललाटाक्ष | लतांग | दशानन |
| ८ | मोचक | कुहासन | कराक्षक | मृत्युनाशन | विषानन |
| ९ | वृक्षभेदी | शतबाहु | पादास्य | अतनु | उग्रदेव |
| १० | कुंजरारि | बहुजिव्ह | विकटांग | घोटवक्त्र | शतपद |
| ११ | शेष | नागदंत | शिलाद | नीरोग | सहस्रस्कंद |
| १२ | शिखिहरित् | षणावपु | हरिन्मुख | भव | त्रिमुखस्कंद |

* पंचमांच्या गुरूंचे जें सूत्र गोत्र वगैरे आहे तेंच सूत्र गोत्र वगैरे त्या पंचमांपासून उत्पन्न झालेल्या उपपंचमांचें समजावें.





